# प्रवाहपतित

लेखक :

गो. कृ. पानसे

फेब्रुवारी १९४०

प्रकाशक :
शं. वा. कुलकर्णी,
छाया प्रकाशन, कोल्हापूर.

सोल एजंट— महाराष्ट्र ग्रंथ-भांडार, कोल्हापूर.

मुद्रक :
वा. ना. ठकार,
श्रीसिद्धेश्वर प्रेस, कोल्हापूर.

# पुरस्कार

रा. पानसे यांची ' प्रवाहपतित ' ही दीर्घ कथा वाचली. एका बैठकींतच ' समाप्त ' पर्यंत येऊन पोचलों आणि मग घड्याळाकडे पाहिलें. दोन तास होऊन गेले होते! रा. पानसे यांची निवेदन पद्धति इतकी चित्तवेधक आहे. अनामिक प्रकरणें एकामागून एक संपतात आणि ' प्रवाहपतिता ' प्रमाणें कथानकाच्या ओघांत आपण वाहत जातों.

रा. पानसे यांनीं प्रस्तुत कथेंत कुठलाहि सामाजिक प्रश्न सोडविण्याचा चंग बांधलेला नाहीं अथवा एकाद्या समस्येवर ' क्ष ' किरणें टाकण्याची हांवहि धरलेली नाहीं. हिंदुस्थानांतील सर्वश्रेष्ठ राजकीय संस्थेंत ( कॉंग्रेसमध्यें ) काम करीत असूनहि राजकारणाची ' टकळी ' त्यांनीं कुठेंहि चालविली नाहीं. प्रणयांतील गुंतागुंती पुस्तकांत भरपूर आहेत. पण विकृत चित्रणानें रंजकता आणण्याचा प्रयत्न नाहीं. या सर्व नकारात्मक विशेषांबद्दल मी रा. पानसे यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों.

प्रस्तुत कथेचा नायक ' नाना ' हा असून त्याच्या जीवितांतील रहस्यमय प्रणयावर कथेची उभारणी करण्यांत आलेली आहे. निर्मलेचें जन्मरहस्य कळल्यानें नानाचा मनोभंग होतो, आणि नानाकडून ज्या तऱ्हेच्या व जितक्या उत्कटतेच्या प्रेमाची अपेक्षा सरोजनें केलेली असते त्या तऱ्हेचें व तितकें उत्कट प्रेम त्याच्याकडून न मिळाल्यामुळें सरोज जीवनयात्रा संपविते. कादंबरी वाचून झाल्यावर डोळयांच्या ओलसर झालेल्या कडा पुसण्यासाठीं हात तिकडे वळतात. इतका करुणरस चांगला साधला आहे. एका श्रीमंत जमीनदाराशिवाय पट्टीचें खलप्रकृति पात्र कोणी नाहीं. जगांतली दुःखें व निराशा हीं दुष्ट माणसांच्या कारस्थानाचींच फळें असतात

असें नाहीं. सर्वजणें चांगलीं असून देखील शोकान्त टाळतां येत नाहीं, असा ' **संसारोऽयमतीवविचित्रः** ' आहे !

लेखकाची भाषा ललित आहे. क्रियापदें गाळून क्वचित् जोर आणण्याचा लेखकाचा प्रयत्न चांगला साधला आहे. विकसन याला ' उत्फूलन ' हा शब्द विशेष प्रसन्न मला तरी वाटला नाहीं. ' रश्मी ' ह्या मुख्या शब्दानें सूर्याचा बोध होणार नाहीं. ' चेहरा गोड स्मित केलेला होता. ' असें वाक्य कानाला विचित्र लागतें. असो. हे दोष परिश्रम, अध्ययन व सावधानता यांयोगें सहज जाण्यासारखे आहेत.

रा. पानसे यांच्या अंगीं सहानुभूति व लेखनकौशल्य हे गुण निःसंशय आहेत. ते त्यांनीं तपश्चर्येनें वाढीला लावले तर लोकप्रिय कथालेखक म्हणून चमकण्यास त्यांना अडचण पडूं नये असें मला वाटतें.

आनंद कार्यालय, पुणें.
२३।१।४०

**गोपीनाथ तळवलकर**

# मंदिर-प्रवेश

मंदिरांत नवीनच प्रवेश करावयाचा म्हणजे किती धोक्याचें. अस्पृश्यांनीं मंदिरांत प्रवेश करावयाचा ज्या वेळीं चंग बांधला आणि प्रत्यक्ष प्रवेशाच्या इराद्यानें त्यांनीं मंदिराच्या पायरीवर पहिलें पाऊल टाकलें त्या वेळीं स्पृश्यास्पृश्यांमध्यें झालेल्या डोकेफोडीचें भयाण चित्र, त्या प्रसंगाची आठवण झाल्यावर, माझ्यापुढें उभें राहतें. आणि मग भीति वाटूं लागते—

मनांत विचार येतो कीं, सरस्वतीच्या मंदिरांत शिरावयाचें असेल तर-तर आपल्याला त्या मंदिरात प्रवेश मिळेल का? आपण त्या मंदिरांत शिरण्याकरितां अस्पृश्यच नाहीं का? तिचे सेवक आपला तेजोभंग नाहीं का करणार? पण 'भित्यापाठीं ब्रह्मराक्षस.' आपण जों जों भ्यावें तों तों त्या देवीच्या मंदिरांत नुसता प्रवेश मिळणें लांबच. मग तिची सेवा आपल्या हातून कशी घडणार? त्यासाठीं मी ठरविलें कीं, आपली प्रवेशाची तयारी ठेवावी आणि कोणी प्रोत्साहक मिळाल्यास पुढें पाऊल टाकावें.

त्याप्रमाणें अगदीं सुरवातीलाच मी माझी 'प्रवाहपतित' दीर्घकथा वाङ्मयांत अधिकार असलेल्या एका माझ्या हितचिंतकाना दाखविली. त्या वेळीं त्यांनीं मला 'मंदिर-प्रवेश' करण्यास प्रोत्साहन दिलें. त्यांच्या प्रोत्साहनानें उत्तेजित झाल्यावर माझे स्नेही श्री. शंकरराव कुलकर्णी यांनीं ती प्रकाशित करण्याची जबाबदारी स्वतःवर घेऊन ती त्यांनीं अति अल्प काळांत पार पाडली. अभ्यासू चित्रकार इंदू गोळे व रा. पंडित देशपांडे यांनीं आपल्या कलेच्या अभ्यासाचा अमूल्य वेळ खर्चून मलपृष्ठावरील चित्र तयार करून दिलें. सगळ्या गोष्टी झाल्या. मंदिर-प्रवेशाची सर्वतोपरी

सिद्धता झाली; परंतु प्रथमतःच कोठेंहि एकाकी प्रवेश करणें बिकटच. बरोबर कोणी माहितगार आणि स्नेहानें सल्ला देणारे असल्याशिवाय भीति मोडून प्रवेश होत नाहीं. श्री. गोपीनाथ तळवलकर यांनीं हें शेवटचें पण अतिशय महत्त्वाचें सहाय्य मला केलें.

या व आणखी माझ्या बऱ्याच स्नेही मंडळींनीं मला सहाय्य करून माझें श्रीदेवीसरस्वतीच्या मंदिरांत प्रथम प्रवेश करणें सुलभ केलें, याबद्दल या सर्व मंडळींचा मी अत्यंत आभारी आहें.

पुणें,
ता. २३।१।४०

गो. कृ. पानसे.

# गृहिणी-जीवन माला

**उद्देश**—स्त्रियांना विशेषतः गृहिणींना मार्गदर्शक व उपयुक्त होतील अशीं पुस्तकें प्रसिद्ध करणें.

**नियम**—( १ ) आठ आणे प्रवेश फी भरून मालेचे कायम ग्राहक होणारांस मालेचें प्रत्येक पुस्तक पाउणपट किंमतीस मिळेल. मात्र कायम ग्राहकानें मालेचीं प्रसिद्ध होणारीं सर्व पुस्तकें घेतलीं पाहिजेत.

( २ ) या मालेंतून वर्षात दोन अगर तीनच पुस्तकें प्रसिद्ध होतील.

( ३ ) मालेचें ध्येय स्त्रीजीवनाला पोषक असल्यामुळें त्या बाबतींत अनुभविक स्त्रियांनीं केलेल्या सूचना ग्राह्य मानून प्रत्येक पुस्तकप्रसिद्धीच्या वेळीं त्याचा विचार केला जाईल. यासाठीं या मालेमुळें स्त्रियांना विचार-विनिमयाची जागा म्हणून या मालेचा उपयोग करतां येईल.

( ४ ) मालेचा उपयोग सर्वसाधारण स्त्रियांना व्हावा म्हणून पुस्त-कांच्या किंमतीकडे व घरपोंच पुस्तकें देण्याकडे विशेष लक्ष पुरविलें जाईल.

महाराष्ट्र ग्रंथ भांडार
कोल्हापूर.

व्यवस्थापिका,
कु. आशा कुलकर्णी.

# प्रवाहपतित

## १

तेजोराशीचीं बालकिरणें सभोंवतालच्या प्रदेशांवर पसरलीं होतीं. झोपेंतून जागे व्हावें, आणि आलेला आळस घालविण्याकरतां हातपाय ताणावेत, तद्वतच तीं किरणें आपल्या अंथरुणावर हातपाय ताणून एकप्रकारचें नृत्यच करीत आहेत असा भास होत होता. त्याच्या नृत्याला साथ म्हणूनच कीं काय– मंदगतीनें पवनाचें संगीत, हिरव्याचार वृक्षवेलींसमवेत चाललें होतें. आपण गायनात किती कुशल आहोंत––हें दाखविण्याकरिता पवनानें त्यावेळीं मंजूळ ताना घेण्यास सुरवात केली होती. म्हणूनच नर्तकाचे अंगावरील दागदागिने—दंवबिंदू चमकतांना दिसत.

नाना मात्र गुलाबी झोपेंत निमग्न झाला होता. कसल्यातरी जबाबदारींतून सुटल्यानंतर ज्या सुखशय्येचा मनुष्य उपभोग घेतो; त्यावरच ही स्वारी आज अशा रम्य वेळीं अर्धवट जागृतावस्थेंत खुशाल विश्रांति घेत पडली होती. जणूं प्रांजलपणाचें प्रतीकच त्याच्या मुखावर विनटलें होतें. तो गोरा नव्हतां; तांबूस वर्णाचें गुलाबी तेजोवलय त्याच्या निद्राच्छादित मुखमंडलावर दृष्टिगोचर होत होतें. चेहरा गोड स्मित केलेला होता. केसांचा एक पुंज कपाळावर आलेला होता. डोळे पापण्यामध्यें

लोपले होते. पूर्वेकडील खिडकींतून येणारें कोवळें ऊन त्याच्या गालांवर पडलें होतें.

किती आनंदांत नाना निजला होता. पण त्याच्या या गोड गुलाबी झोपेचा मोड एका माशीनें केला. एक माशी त्याच्या उजव्या गालावर बसली. तिचें अस्तित्व त्या नाजूक कपोलाला समजलें. आणि तिला घालविण्याकरतांच त्याला त्या गुलाबी झोपेचा त्याग करावा लागला. त्याग,—प्रिय गोष्टींचा वियोग सहन होत नाहीं. आणि तो सहन करतेवेळीं मन अधिकच दुर्बल होतें. त्याच्यावर जुलूम करावा लागतो. मनाची अतिशय ओढाताण होते. त्या माशीच्या अकस्मिक स्पर्शामुळें त्याची तंद्री भंग झाली. साहजिकच त्याच्या तरुण हातापायाची हालचाल सुरू झाली. तेंही एक प्रकारचें नृत्यच—

त्याच्या खोलींत सरोज आली. त्याचें लक्ष तिच्याकडे नव्हतेंच. गुलाबी झोपेच्या समारोपाच्या समारंभांत तो दंग झाला होता. ती त्याच्यासमोर जाऊन उभी राहिली तरी तो गप्पच.

" आज फिरायला नाहीं यायचं वाटतं? " ती म्हणाली.

" हो! सरोज, विसरलोंच शेवटीं—पण—आज नाहीं गेलं तर नाहीं चालायचं कां? ऊन पाहिलंस कां किती कडक पडलं आहे—" बोलतां बोलतां तो उठला. केसावरून कंगवा-ब्रश फिरवून त्यानें अंगांत शर्ट घातला.

" तूं नेहमी अस्सं करतोस! परीक्षा संपली ना? " ती म्हणाली.

" आजचा दुसराच दिवस उजाडला " किंचित् हंसला तो.

" म्हणजे, परीक्षेनंतर मला वाटतं जग झोपेंतच गुंग रहातं नाहीं? " ती त्रासली होती.

" तें मला माहीत नाहीं सरोज, उद्यां जर तुझ्याबरोबर फिरायला नाहीं आलों तर—" तिच्यापुढें येऊन तो एकदम म्हणाला, " तर तूं मला वाटेल ती शिक्षा कर! सजा सुनाव!! कैदेंत ठेव!!! आतां—"

" अनियमितपणा मात्र तूं नियमितपणें पाळतोस. "

" रागावलीस कीं काय? आणि हें पुस्तक कसलं? "

" मला पाहिजे तें वाचायला " त्याचा हात बाजूला सारून ती म्हणाली.

" माझं झाल्यावर तूं वाच कीं, सरोज–सरोज रागावूं नकोस पण –ने तें पुस्तक– "

" ने तें पुस्तक– " त्याला वेडावून ती चालूं लागली. खोलीच्या दारांतून तिनें एकदां मागें पाहिलें. ती रागानें तप्त झाली होती. श्वासोच्छ्वास जलद होत होता. तिच्या शरीरांतील सर्व नसा जणूं थयथयाट करीत होत्या सर्व शरीरभर.

---

## २

काकू घरांत सकाळच्या गृहकृत्यांत गुंतल्या होत्या. सरोज फिरायला म्हणून गेलेली त्यांना माहीत होतें. आणि त्यामुळें ती स्वैपाकघरांत उशीराच येणार, म्हणून त्याचें काम जरा सावकाश चाललें होतें. परंतु ती नानाच्या खोलींतून तशीच स्वैपाकघरांत आली. तिनें हातांतलें पुस्तक काकूंच्या समोर भिरकावून दिलें आणि मोठ्या रागानें ती म्हणाली. " काकू! तुझा लाडका नाना बघ किती वेळ झोपतो. अजून देखील तो उठला नाहीं. "

भिरकावलेल्या पुस्तकांतून एक अर्ध–कार्ड बाहेर आलें होतें. तें सरोजनें चटकन् उचलून घेतलें. आणि तिनें त्या कार्डावर क्षणभर दृष्टि धरली. " आणि हें पहा–पहा–पहा " असें म्हणून तिनें तें कार्ड काकूंना दाखविलें. तो एक फोटो होता.

तो फोटो पाहिल्यावर काकूंचें अंग एकदम शहारलें. त्यांनीं तो फोटो तिच्या हातांतून घेतला. त्या फार भ्यायल्या होत्या, घाबरल्या होत्या. तितकेंच त्यांचें तोंडही केविलवाणें झालें होतें.

" हा होता कुठें ? " त्यानीं विचारलें.

" त्याच्या पुस्तकांत-- " हें वाक्य बोलतांना मत्सरानें ग्रासलेल्या स्वभावाशीं ती तादात्म्य पावली होती. तरी पण आईची घाबरलेली वृत्ति पाहून तिलाही किंचित् भीति वाटली. म्हणून ती म्हणाली " काकू तूं घाबरलीस कां ? "

" सरोज हें जर त्यांना कळलें तर ते त्याला घरांत ठेवावयाचे नाहींत — त्यांना असं आवडत नाहीं -- आणि त्यांचा हेतु फार निराळा आहे. "

हे काकूंचे शब्द ऐकून तर तिला फारच आनंद झाला. नानाची खोड मोडावयाचें साधनच मिळाल्यासारखें झालें तिला.

" काकू, कर्मानुसार होणाऱ्या या गोष्टी— " एखादा तत्त्ववेत्ता संचारला होता जणूं तिच्या शरीरांत. " क्रमप्राप्त आहेत या गोष्टी आणि असं कांहीं झाल्याशिवाय माणसं शुद्धीवर येत नाहींत."

" तें खरं. सरोज, तुझ्यासारखाच तो मला. तीनच वर्षांचा होता. त्याला लहानाचा मोठा मी केला. त्याला कांहीं झालं तर मला बरं वाटेल कां ? "

" तेंच ना ! तुझ्या मुलानं सुधारावं असं वाटत तुला ? "

काकू कांहींच बोलल्या नाहींत. त्यांची भीति दुणावतच जात होती. पुढें काय करावें हें त्यांना सुचेना. तो फोटो फाडून टाकून त्याच्या चिंध्या तुकडे करावेत असें त्यांना वाटलें. तसें करण्यास त्या प्रवृत्तही झाल्या; पण सरोजनं त्यांना तसें करूं दिलें नाहीं. तिनं तो फोटो त्यांच्या हातांतून घेतलाच.

हातांत फोटो आल्यावर विजयी योद्धयाला जो आनंद होतो तो तिला झाला. सूडभावना हीच या वेळेला तिच्या अंगांत संचारली होती, स्त्रियांचा स्वाभाविक भित्रा स्वभाव आणि त्यांची स्वाभाविक आर्द्रता यांचा लोप

झाला होता. आणि त्यामुळें तिचे जीवित तिलाच रूक्ष वाटूं लागलें होतें. त्या रुक्षतेंत सुद्धां तिला अमित आनंद झाला होता. म्हणूनच ती फोटो हातांत पडतांक्षणींच तेथून आपल्या खोलींत निघून गेली.

काकूंच्या समोरून सरोजनें स्वैयंपाकघरांतून पाय काढला तरी त्या कसल्यातरी विचाराच्या नादांत असल्यामुळें त्यावेळेस त्या तिला कांहीं विचारूं शकल्या नाहींत. दादाकाकांच्या एकंदर स्वभावाविषयीं त्यांचे विचार चालले होते. त्यांचा स्वभाव किंचित् हट्टी होता. निग्रह-पूर्वक ते एखादी गोष्ट करीत. त्यांचा राग शांत करणें फार जिकिरीचें आणि धाडसाचें काम. निदान त्यांच्या घरातल्या माणसांना तसें वाटे. बाहेरच्या माणसाशीं ते अतिशय सलोख्यानें वागत आणि क्वचित् व योग्य वेळीं ते रागाची अंमल बजावणी करीत.

त्या लहानशा शहरांत एक प्रमुख व्यक्ति म्हणून दादाकाकांची गणना होत होती. दादाकाका जरी सनातनी नव्हते तरी त्यांना, सुधारक म्हणविणाऱ्यांच्या बऱ्याचशा गोष्टी आवडत नसत. विशेषतः तरुण आणि तरुणी यांच्या विवाहपूर्व प्रेमसंबंधावर त्यांचा फार कटाक्ष असे. त्यांना तें प्रेम आहे—जाज्वल्य, आणि पवित्र आहे हें पटत होतें. पण त्याचें स्तोम माजविलें कीं त्याना चीड येई. त्या प्रेमाचें कांहीं बरें वाईट झाल्यास त्याचा परिणाम प्रेमबद्धाच्यावर होऊं नये असें त्यांचे मत होतें.

या त्यांच्या स्वभावधर्मामुळें या फोटो प्रकरणांत काय काय होईल याचा पूर्ण कयास काकू जरी करूं शकत नव्हत्या, तरी घरांतील वातावरण आहे त्या स्थितींत राहील असें मात्र त्यांना वाटत नव्हतें.

म्हणून तो फोटोच नको कुणाच्या दृष्टीस पडायला, असें त्यांना पुन्हा वाटलें. आणि सरोजलाही चार शब्द सुनवावेत याकरतां त्यांनीं तिला हळूच हाक मारिली. परंतु ती तेथें नसल्याचें त्यांच्या त्याच वेळीं लक्षांत आलें.

---

# ३

सरोज स्वैंयंपाकघरांतून उठून आपल्या खोलींत येऊन बसली होती. ती आनंदानें बेहोष झाली होती. तिच्यावर अनुरक्त असलेला नाना अलीकडे विरक्त कां होऊं लागला ह्याचें कारण आज तिला सांपडलें होतें. आणि त्याची विरक्तता कशी घालवावी या बाबतींत तिला प्रौढ विचार न सुचतां पोरकट विकारांचें वावटळ तिच्या डोक्यांत सुरूं झालें होतें. आणि लहान मुलांना झोपाळ्यावर हेलकावे खातांना जशा आनंदानें गुदगुल्या होतात, त्याच प्रमाणें या विकाराच्या झोल्यावर हेलकावे खात असतांना तिला आनंद होत होता.

अभ्यासाच्या टेबलासमोरील खुर्चीवर ती जाऊन बसली होती. हातांत तो फोटो होताच. त्याच्याकडे ती वारंवार पाही आणि तत्क्षणीं तिच्या मनांत नानाप्रकारचे भावनोद्गम होत. लगेच ती आरशासमोर जाऊन उभी राही. आणि असें तिनें किती तरी वेळां केलें. शेवटीं त्रासली ती. कंगवा घेतला, आणि केसांची भूषा वाढविण्यास सुरवात केली तिनें. पावडर, पोमेड, स्नो, नाना प्रकार झाले, पण त्या फोटोशीं तिचें सौंदर्य स्पर्धा करूं शकेना.

एक नि:श्वास सोडून ती आपल्या खुर्चीवर जाऊन बसली. तो फोटो तिनें दूर फेकून दिला. आणि दोन हातांच्या अर्धसंगम केलेल्या उशीवर तिनें आपलें कपाळ टेकलें.

इतक्यांत "सरोज—मी आलों—फिरायला जायचं ना?" तिला ऐकूं आलें.

तिनें तशीच आवाजाच्या दिशेला मान फिरविली. फिरायला जाण्याच्या तयारीनें तो आला होता. त्यानें अगदीं साधाच पोषाख केला होता. परंतु त्याच्या शरीरावर तो खुलून दिसत होता. डोक्यावर किंचित् चकाकणारे काळे केस विषमतेनें दुभंग झाले होते. ऐन तारुण्याचा

तजेला अणूमात्र काळा झालेला त्याचा वरचा ओठ जास्ती भासवीत होता.

सरोज त्याच्याकडे पहातच राहिली होती.

" सरोज—" त्यानें पुन्हा हाक मारली. तिनें तोंड फिरविलें. तो तिच्याजवळ गेला. आणि तिच्या पाटीवरून हात फिरवून त्यानें तिला पुन्हा हाक मारली. तरी देखील तिनें त्याच्याकडे पाहिलें नाहीं.

तो परत फिरला.

इतक्यांत त्याच्या दृष्टीस तो तेथेंच जमिनीवर पडलेला फोटो आला.

आश्चर्य वाटलें त्याला.

घाबरला तो.

" निमा ! " तो एकदम बरळून गेला.

" नुसते निमा नव्हे; प्रिय निमास– " सरोज खडबडून जागी झाल्यासारखें होऊन म्हणाली. " आणि तें कपलेट वाच. " तेवढ्यांत तिनें तो फोटो स्वतःच्या हातांत घेऊन वाचण्यास सुरवात केली.

" कमलिनी फुलते सरोवरी, किती दूर तरी ।
हृदयीं रसिका प्रिय भारी, नच अव्हेरी !"

वाचून झाल्यावर ती म्हणाली, " नाना शोभतं ना तुला हें ? कोण रे आहे ही निमा ? तिचं तुला इतकं वेड कां लागलं ? तुला मी सांगायला हवं आहे असें नाहीं; परंतु असल्या प्रेमाच्या फंदात पडूं नकोस. याचे परिणाम चांगले होतात, आणि होत नाहीतही–आणि असं असतांना आभासमय भविष्यावर विश्वास ठेवून वागणं निदान तुझ्या- सारख्या तरुणाला तरी बरं दिसत नाहीं. काकांना यातलं समजलं तर—" ती गप्प बसली.

इतका वेळ नाना बर्फ झाला होता. काकांचें नांव ऐकल्यावर तो आंतून वितळायला लागला. एकामागून एकेक विचार त्याच्या डोक्यांत सुरूं झाले. सरोजचे शब्द त्याला विचित्र वाटूं लागले. तिला तो कांहीं तरी बोलणार होता. त्याचे ओठ थरथरत होते. पण शब्द बाहेर पडेना. नाना कांहीं बोलणार आहे असें तिलाही वाटत होतें म्हणून परिणामाच्या भेसूर चित्राची प्रस्तावना करण्याचें थांबवून ती एकदम स्तब्ध झाली

होती. तो आतां बोलेल, क्षणानें बोलेल म्हणून ती त्याच्याकडे अधीरतेनें पहात होती. पण तो कांहींच बोलत नाहीं असें पाहून तिनेंच पुन्हा बोलण्यास सुरवात केली. पहिल्यापेक्षां ती पुष्कळच शांत झाली होती.

" नाना—! नाना—! नाहींना बोलत तूं ? तुझ्या कृत्याचा तुला पश्चात्ताप होत नाहीं ना ?" यापुढें ती थोडा वेळ थांबली. परंतु तिच्यानें रहावेना. ती आपल्या जागेवरून उठली, अगदीं त्याच्याजवळ आली. पदराचें टोक दोन्ही दातामध्यें तिनें धरलें होतें. " नाना मी काय समजूं ? " ती म्हणाली आपण हें काय बोलून गेलों असें तिला वाटलें. आणि साहजिकच तिची दृष्टि खालीं वळली.

नानाच्या कानांत तिचे शब्द शिरत नव्हतेच. पण ती कांहीं विचित्र बोलते आहे असें त्याला भासत होतें. त्यामुळें तो मनांत अगदीं त्रस्त झाला होता.

" सरोज, पुरे ना आतां. घायाळ झालों बरं मी !" तो म्हणाला. केविलवाणी झाली होती त्याची स्थिति. तो हळव्या मनाचा होता. दादाकाकांचा राग सहन करण्याची त्याची ताकद नव्हती. आजपर्यंत ते त्याच्यावर कधीं रागावले नव्हते. ते रागावले तर त्यांना उलटीं उत्तरें देऊन वेळ मारून नेणें त्याच्या बुद्धीला पटेना.

अपार विचारसमुद्रांत भटकत असलेलें त्याचें मन अचानक किनाऱ्याशीं आलें.

' सरोज ! ' त्यानें हाक मारली.

व्यक्ति नेहमींच्या परिचयांतली जरी असली तरी तिचें रूप निरनिराळ्या वेळीं निरनिराळें दिसतें.

सरोज किंचित् अधोवदन झाली होती. काळ्याभोर केसांचा सैलसा अंबाडा तिच्या मानेवर रुळत होता. आणि त्यावर निशिगंधाच्या फुलांची वेणी घातली होती. वेणींतील हिरव्या तांबड्या लोकरीचे तुकडे आणि चांदेरी कलाबूत थोड्या हालचालीबरोबर अति गोड थरथरे. फुग्याखालून डोकावणाऱ्या तिच्या कानांतील कुड्या नानाकडे जणूं रागानें पहात होत्या. पदरानें डाव्या खांद्याचा आधार घेतलासें करून

इतस्ततः वावरण्यास सुरवात केली होती. ( विनय आणि शालीनता यांविरुद्ध बंडच तें—असें म्हटल्यास आमच्या जुन्या जमान्याला पटेल.)

यामुळें त्याला ती फार सुंदर दिसली. तिच्यापासून त्याला हलवेना.

‘ सरोज—’ तो पुन्हां म्हणाला.

तिनें वर पाहिलें.

तिच्या डोळ्यांत पाणी चमकत होतें. नजरेला नजर! पण अर्ध क्षणच.

❀ ❀ ❀ ❀

तिच्या खोलींतून बाहेर पडल्यावर नाना एक बॅग घेऊन घराबाहेर पडला.

---

# ४

“ सरोज—

घरांतून बाहेर पडतांना विचार करण्यासारखी माझ्या मनाची स्थिति नव्हतीच. माझें आतांपर्यंतचें आयुष्य म्हणजे तूं, काका आणि काकू. या तुमच्या प्रेमळ विश्वांत मी दिवस काढले, लहानाचा मोठा झालों. शिकविला गेलों—

आणि आतां घराबाहेरच्या विश्वांत–जेथें कोणी कोणाचें नसतें, प्रेमळ शब्दावरून वहाणारा वारा सुद्धां अंगाला स्पर्श करूं शकत नाहीं—असें रखरखीत वाळवंट तुडविण्याकरतां निघालों. परंतु या वेळेला हेंच मला उचित वाटलें.

माझा इतिहास संपूर्णपणें जरी मला माहीत नसला तरी मी एक तुझ्या काकूचा मानसपुत्र आहे हें मला ठाऊक आहे. मी एक पाळलेला मुलगा असल्यामुळें मला तुझ्या अनुरोधानें वागतां आलें नाहीं. आणि वागण्याचा अट्टाहास केला असता तर यापूर्वीच कदाचित् मला तुझ्या घराचा उंबरा सोडावा लागला असता.

तुला हे विचार पटोत न पटोत सरोज, पण मला प्रेमाविषयीं थोडी निराळी कल्पना आहे. प्रेमाच्या मुळाशीं परिस्थिति असते. केवळ आकर्षणच असतें असें मानायला मी तयार नाहीं.

रागावूं नकोस. तूं मला या कृत्याबद्दल धन्यवादच द्यावेस असे मी इच्छितों. प्रवाहाचे तीर सोडून प्रवाहांतच उडी टाकली आहे खरी—चांगले पोहणारेसुद्धां प्रसंगीं बुडतात हें मी जाणून आहें.

माझा नमस्कार काका–काकूंना सांग हं—विसरूं नकोस—

नाना."

जेवावयाची वेळ झाल्यामुळें सरोज नानाला बोलाविण्याकरतां गेली. परंतु नाना खोलींत तिला दिसला नाहीं. त्याच्या टेबलावर वरील पत्र पडलें होतें. तें तिनें उचललें आणि वाचलें.

एखाद्या गोष्टीची मुद्दाम आठवण ठेवावी आणि ती ऐन वेळीं विसरावी, त्यामुळें जशी मनाला रुखरुख लागते तसें तिचें झालें. खोलींत शिरण्यापूर्वी तिचा संकल्प असा कीं, नानाशीं थोडें गोड बोलावयाचें—त्याच्या मनाचा शीण थोडा कमी करावयाचा ( प्रेमप्राप्तीचा हा एक मुत्सद्देगिरीचा डाव असावा! ) पण त्याच्या या आकस्मिक जाण्यानें ती अगदी हतबुद्धच झाली. यापूर्वी ती कितीदां तरी त्याच्यावर रागावली होती. पण तें रागावणें तितकेंच असे. लवकरच त्यांच्यामध्यें मित्रत्वाचा तह होई. उलट अशा वेळीं गाढ मैत्रीचा एखादा धागा जास्तीच विणला जाई.

त्यामुळें या खेपेला तिला कांहीं तरी चमत्कारिकच वाटूं लागलें. तो जावा अशी तिची मुळींच इच्छा नव्हती. उलट तिला तो तिचा सहकारी म्हणून पाहिजे होता. मात्र प्रेमाची केविलवाणी कौतुक प्रदर्शनी

तिला करावयाची नव्हती. प्रेमानें विव्हळ होऊन तिला वागावयाचें नव्हतें आणि म्हणूनच तिचे असे उलटे पालटे डाव चालले होते.

पण त्यांचा उपयोग कांहींच झाला नाहीं. कशी तरी ती जेवण-घरांत पानावर येऊन बसली. जेवायचं नाहीं म्हटलं तरी पंचाईत—लगेच कां जेवायचं नाहीं या प्रश्नाचें सार्थ उत्तर देण्याची तयारी असावयाला पाहिजे— नाना निघून गेला असें एकदम सांगितलें तर विनाकारण भलत्या वेळेला घरांत कल्लोळ माजावयाचा आणि काकूचा जीव तिळ तिळ तुटा-वयाचा. या सर्व विचारांमुळें तिनें कांहीं न बोलतांच पानावर बसून घास घेण्यास सुरवातही केली.

'नाना कुठं आहे गं–' काकूंनीं तितक्यांत विचारलेंच.

'खोलींत नाहीं तो, मी पाहून आलें' असें कसें बसें तिनें त्या प्रश्नाचें उत्तर दिलें.

काकांनीं नानाच्या नसण्याला विशेष महत्व दिलें नाहीं. कारण 'असेल कांहीं काम– गेला असेल बाहेर' असें त्यांना वाटत होतें. शिवाय नाना आणि काका बरोबर जेवण्याचा प्रसंग फक्त सुट्टीच्या दिवशींच येत असे. त्यामुळेंही त्यांना नानाच्या नसण्याबद्दल विशेष वाटलें नाहीं. परंतु सरोज आज ठिकाणावर नाहीं. कांहीं तरी बिघडलं असावं तिचं—रागावली असावी कुणावर तरी ती– किंवा 'ही' तरी तिला बोलली असावी असा त्यांचा तर्क वहात होता. म्हणून तिची मुद्रा प्रफुल्ल कर-ण्याच्या इराद्यानें ते मुद्दामच या वेळेला म्हणाले, 'आज आपल्या इथें पाहुणे यायचे आहेत. सरोजला जरा चहा करायला शिकव.'

'काकू शिकविणार नी मला—पण काका हें हो कसलं खूळ! ज्यांनी त्यांनी उठावं आणि मुलींना पहातच सुटावं. आम्ही नाहीं पहात कधीं मुलांना —' ती म्हणाली.

'सारजा—' काकू बोलण्यास सुरवात करीत होत्या. त्या कधीं कधीं सरोजला सारजाही म्हणत.

'काकू, तुझं पुरे हो! आपल्याला चांगली बायको मिळावी अशी त्यांची इच्छा असते, आणि म्हणून हे प्रत्येकाच्या घरोघर हिंडत असतात.'

यावर काका शांतपणें म्हणाले, ' सरोज आतां शाहाणी झालीय. आज सात वर्षं ती या प्रकारचें शिक्षण घेतीयनां ! पण सरोज लक्षांत ठेव, मुलं मुलींपेक्षां मोठी असतात. त्यांना तितकं ज्ञान आलेलं असतं. म्हणूनच तीं मुली पाहूं शकतात. तुम्ही लहान असतां, तुम्हाला अक्कल नसते, म्हणून तुमच्या आईबापांना स्थळं पहावीं लागतात. उगीच आपलं ज्ञान लोकाना दाखवूं नये. चार पुस्तकें वाचलीं म्हणजे तुम्ही शहाण्या नाहीं झालांत. त्यामुळं फक्त फाजीलपणाची पोपटपंची तुम्हाला येऊं लागली. इतकाच त्याचा अर्थ ! '

' मुली लहान असतात वाटतं ? ' सरोज म्हणाली आणि थांबली. या विषयावर ती पुष्कळ बोलणार होती. पण बोलूं कां नको या विचारांत ती होती. पण शेवटीं ठाम मतानें तिनें बोलायचें नाहीं असें ठरविलें. कारण ती असावी तितकी योग्य मनस्थितींत नव्हती.

तोंडांत जात असलेला घास दोनचार वेळां परत फिरला. त्यामुळें झालेल्या प्रकाराला पुन्हा ताजेपणा येत होतां आणि सहाजिकच तिचा हात खिशातल्या फोटोकडे वरचेवर जात होता.

किंचित् वर राहिलेला फोटोचा भाग काकांना दिसला. त्यांनी तो तिच्याजवळ मागितला. फोटो जर त्यांच्याजवळ दिला नाहीं तर नसत्या संशयाचें भूत काकांच्या डोक्यांत शिरावयाचें. सुधारलेलीं मतें अगोदरच तिच्या तोंडून बाहेर पडलेली होती. त्यामुळें तिला तो फोटो त्यांच्या जवळ देणें भाग पडलें.

फोटो पाहून त्यांनी फोटोखालील दोन ओळी वाचल्या. ते तसेंच उठले, आणि रागांतच हात धुवून आपल्या बसण्याच्या खोलींत निघून गेले.

हात धुतां धुतां ते म्हणाले, " नाना आल्यावर त्याला प्रथम माझ्याकडे पाठवून द्या !"

—पण होता कुठें तो त्या गांवांत.

---

# ५

घरांत काका आणि बाहेर दादाकाका असें त्यांचें संबोधन होतें. ते रागीट होते, आणि प्रेमळही पण होते. जितकें सरोजवर ते प्रेम करीत तितकें नानावरही त्याचें प्रेम होतें. नानावर त्यांचा पूर्ण विश्वास होता. तो असे वाह्यात चाळे करणार नाहीं, निदान त्यांच्या धोरणाबाहेर जायचा नाहीं अशी त्याची खात्री होती. पण तो फोटो नानाच्या स्वाक्षरीसह त्यांच्या दृष्टीस पडल्यावर त्याच्या ‘ वाह्यातपणा ’ बद्दल ते निःशंक झाले.

दादाकाका म्हणजे काहीं सामान्य व्यक्ति नव्हती. त्या त्यांच्या ५०।६० हजार वस्तीच्या गावात दादाकाका एक प्रमुख गृहस्थ म्हणून वावरत होते. अधिकारी या नात्यानें सरकारी अंमलदारांचा ते मान-सन्मान, सत्कार जरी करीत नव्हते तरी खाजगी रीतीनें गांवच्या लोकांची बाजू माडून योग्य अशा सुधारणा घडवून आणण्याचा प्रसंग ते दवडीत नव्हते. त्या एवढ्याशा गांवात दादाकाकांच्या नेतृत्वाखालीं निरनिराळे संघ निर्माण झाले होते. आणि त्याचें कामही व्यवस्थित चालत होतें. त्यामुळें दादाकाका आसपासच्या खेडोपाड्यांतसुद्धां लोकांच्या पूर्ण परिचयाचे झाले होते. कोणच्याही कामांत सल्ला–मसलत घ्यावयाची झाल्यास लोक दादाकाकांची घेत असत. दादाकाका कोणी सरदार, जहागिरदार नव्हते तरी त्यांची निःस्वार्थी आणि निस्पृह जनसेवा हीच त्या गांवकऱ्यांना शिस्तींत ठेवण्यास समर्थ होती. त्यामुळें त्यांच्या करड्या आणि कडक शिस्तीचा अद्याप कोणी इन्कार केला नव्हता.

केवळ पुढारीपणाकरतां नव्हे, पण अडाणी खेडुतांच्या उपयोगाकरतां नानानेंही तसेंच वागावें ही त्यांची मनीषा होती. नाना त्याला लायक होता अशी त्यांची आतांपर्यंत समजूत होती. म्हणून त्यांनीं त्याचें शिक्षण केलें, त्याला मदत केली. स्वतःच्या मुलाप्रमाणें त्याच्यावर देखरेख ठेवली. पण आज एका बदफैली बाईच्या मुलीचा फोटो नानाचें प्रेम-

स्थान असल्याचें त्याना वाटल्यावर त्यांच्या विश्वासाचा तो एक बुडबुडा ठरला.

ठरल्याप्रमाणें सरोजला पहाण्याकरतां मंडळी आली होतीच. मामुली गप्पा गोष्टी झाल्यावर सरोज येऊन एका खुर्चीवर बसली. काकांनीं मुद्दाम खुर्च्यांच्या व्यवस्थेची सवलत दिली होती. नाहीं तर तिला गुड-घ्यांत मान घालूनच बसण्याची वेळ आली असती. पाहुण्यांनी किंचित् पाहिल्यासारखें करून पसंती दर्शविली आणि तिला घरांत जाण्यास परवा-नगी दिली. ती गेल्यावर 'बाकीच्या बाबतींत बोलूं नंतर' असें सांगून मंडळी जावयास उठली. जातांना तिचा फोटो बरोबर घेऊन जाण्यास ती मंडळी विसरली नाहींत.

दादाकाका नेहमींच्या मनःस्थितींत नसल्यामुळें अर्थातच या स्थळा-विषयीं त्यानीं सरोजला विचारलें नाहीं. कदाचित् मुलां-मुलींच्या लग्ना-बाबतचे 'सर्व हक्क' आई-बापांच्या 'स्वाधीन' असतात हीही त्यांची कल्पना असावी. काकूंना मात्र या बाबतींत तिचें मत विचारावें असें वाटत होतें. परंतु त्यांना सुचत नव्हतें आज काहीं. नाना घरांतून बाहेर पडला तो अद्याप आला नव्हता. त्याचा शोध करावयास काकांना सांगावयाचें म्हणजे मोठें कठीण काम होतें, म्हणून त्यांना अगदीं मूग गिळून बसण्या-पलीकडे कांहीं करतां येईना. त्यांतूनही त्यांनीं कोणालासें पाठविलें होतें. तो त्याच वेळीं परत आला. आणि त्यानें एक लहानशी चिठ्ठी दिली.

" काकू !

मी कोठेंही गेलों तरी सुखांत राहीन. तूं काळजी करूं नकोस आणि माझा शोध वगैरे करण्याच्या भानगडींत पडूं नकोस. जातांना तुला एखादं पत्र लिहून ठेवावयाचं विसरलों. बरं झालं अनायासे हा मनुष्य आतां येथे आला. मी भेटीन अं तुला पुन्हा. पुष्कळ लिहिणार होतों. पण मला आतां बिलकूल वेळ नाहीं. काकू मी तुला भेटेन हं. माझी बिलकूल काळजी करूं नकोस. —नाना "

हें पत्र वाचल्यावर काकूंचा जीव खाली पडला. आणि नंतर त्या सरोजकडे वळल्या.

" सरोज, पाहिलंस कां तूं त्यांना ? " त्या म्हणाल्या.

" त्यांनीं मला पाह्यचं कीं मी त्यांना ? " सरोजचें वाक्य पूर्ण होतें न होतें इतक्यांत सरला तेथें आली.

सरला एक तिच्याच वयाची तिची मैत्रिण. बांधा सडपातळ, वर्ण निमगोरा, नाक--डोळे तरतरीत, गळ्यांत एकदाणी व मंगलसूत्र, कानांत कुडी, कपाळावर एक सुंदर लाल टिकली. विपुल केशसंभाराचा व्यवस्थित अंबाडा आणि त्यावर एकच फूल असें तिचें वर्णन. तोंडावर किंचित् प्रौढपणा दिसत होता.

सरोजचें वाक्य तिनें ऐकलें होतें.

आल्याबरोबर ती काकूंना म्हणाली. " पाहिलंत काकू, या आतांच्या मुली अगदीं उलटीं उत्तरें द्यायला मुळीं भीतच नाहींत."

" चेष्टा कसली सुचते सरला तुला वाटेल त्यावेळीं " ती जरा रागानें म्हणाली. " पाहूं काकू तें पत्र काय तें ? " त्याच तोऱ्यात तिनें काकूंच्या हातचें पत्र घेतले, आणि ती आपल्या खोलीच्या मार्गाला लागली.

ती गेल्यावर सरलेनें ' काय झालें ' म्हणून काकूंना विचारलें.

" तिला आतां पाह्यला आले होते. म्हणून मी तिला तिचें मत विचारलें. ती कुठें सरळ बोलतीय. मला आपलं पहिल्यांदा वाटे कीं, शिकावं पुष्कळ शिकावं. पण त्यामुळें माणसं असं काहीं वागूं लागलीं कीं वाटतं, काय या शिक्षणाचा उपयोग ? सरला, हें आतां पाह्यला आलेले गृहस्थ किती छान दिसतात गं. घरीं चांगली श्रीमंती—घरांत कोणी तिसरें माणूस नाहीं. हिला काय झालंय कोण जाणे ? " काकू थोड्या वेळ थांबून पुढें म्हणाल्या, " सरल, तूं तरी बघ विचारून तिला."

सरोज हें सगळं ऐकत होती. ती त्यावेळीं एकदम बाहेर आली. आणि म्हणाली, " काकू, ती काय सांगणार मला आणि विचारणार— ? ते गृहस्थ मदनाच पुतळे असूंदेत—कुबेराचे बाप असूंदेत-मला त्यांच्या बाबतींत कोणीही कांहींही सांगूं शकणार नाहीं."

काकू तर ' बाई ! बाई ! बाई ! ' करीत तेथून हलल्याच.

“ सरोज, हें काय मांडलंस तूं आज ! ” सरल तिची वृत्ति लक्षांत घेऊन न रागावतां म्हणाली. सरल तिच्याजवळ गेली. तिच्या पाठीवरून तिनें हात फिरविला आणि तिला हाताला धरून ती खोलींत घेऊन गेली.

“ सरोज असं रागावूं नये.”

“ मग काय करूं– ? ”

“ पण रागवायचं काय त्यांत ! नीट बोलावं--वडील माणसं आपल्या सुखाकरतां सारखीं झटत असतात– ”

“ मला नाहीं सुचत कांहीं–येतो राग––”

“ हो, पण काकूंना या तुझ्या बोलण्यानें किती वाईट वाटलं असेल याची कल्पना आहे कां तुला ? ”

“ करतात सगळं आपल्या मनानं, आणि त्यांत मला विचारायचं ढोंग कां करावं मी म्हणतें.”

“ हो ग, तें खरं आहे. पण अजून कांहीं ठरलं नाहीं. समंजस-पणानं वागावं जरा. ”

“ मी नाहीं समंजस. ”

“ असं कसं म्हणतां येईल. शिकलीस तें—”

“ नको बाई सरल तूं आणखी मला सतावूंस. माझं डोकं नाहीं आज ठिकाणावर. उद्या मागेन तुझ्या काकूची क्षमा पाहिजे तर. ”

“ बरं मग मी जाऊं ? ”

“ तुला मी जा म्हटलं वाटतं ? ”

“ तूं बोलणार नाहींस. मग मी उगीच बसूं ? ”

“ मी जरा वेळानं बोलेन तुझ्याशीं. ”

“ मग मी जरा वेळानं येईन तुझ्या घरीं. जातें हं मी. ” सरला निघून गेली.

# ६

" काय नाना कसं काय ठीक आहे ना ? "

" सब खुशाली की बात है ! "

" वा ! तुम्ही आमच्या अमिराबादला येऊन लगेच हिंदी बोलूं लागलात अं ? "

" देश तसा वेश घ्यावा लागतो दादासाहेब. "

" आमच्या या प्रांतात मुसलमानी अंमल असला तरी हिंदू पुष्कळ आहेत. "

" मग म्हणा राजा तशी प्रजा—माझी कांहीं हरकत नाहीं. "

" अगदीं हजरजबाबी आहात पेशवाईतल्यासारखे."

" म्हणा काय वाटेल तें—बरं, फिरायला येणार आहांत ना ? "

" चला कीं. "

हा जवळ जवळ त्यांचा रोजचाच शिरस्ता होता. दादासाहेब आणि नाना यांचा स्नेह जरी अगदीं नवाच होता तरी त्याला " अकालीं वार्धक्य " आलें होतें. दादासाहेब नानाचे वरिष्ठ होते. तें नातें ते फक्त शाळेतच संभाळीत. घरीं ते दोघे जानी दोस्त झाले होते.

दादासाहेबांचा स्वभाव मनमिळाऊ होता. त्यामुळें चांगलीं माणसें मिळविण्यास त्यांना फारसे श्रम पडत नसत. आणि एक एक चांगलें माणूस मिळावावयाचा त्यांना नादच लागला होता.

नाना अमिराबादच्या स्टेशनावर सकाळीं सातच्या सुमारास उतरला. गांवांतून एक चक्कर मारून निर्मला भेटल्यास पहावी असा त्याचा विचार होता. निर्मला अमिराबादला आली आहे येवढेंच त्याला कळलें होतेंसं दिसतें. जमल्यास तिला भेटावें नाहींतर परत स्टेशनवर येऊन पुढें कोठें जायचें तें ठरवायचें असा त्याचा विचार असावा.

थर्डक्लास वेटिंग रूममधील नळावर जरा मुखमार्जन करून त्यानें

चहा वगैरे घेतला आणि नऊच्या सुमारास तो गांवांत जाणार असल्यामुळें वेळ घालविण्याकरतां त्यानें एक स्थानिक दैनिक खरेदी केलें.

नशीब त्याचें. अमिराबाद एज्युकेशन सोसायटीच्या महाराजा हायस्कूलला मास्तरच्या दोन तीन जागा भरावयाच्या होत्या. त्यानें अर्ज वगैरे न करतां समक्षच शाळेच्या सुपरिन्टेंडंटना भेटावयाचें ठरविलें.

त्याच्या बोलण्याची अस्खलितता, आणि इंग्रजी भाषेवरचें प्रभुत्व त्याच्या परीक्षेला पुरेसें होतें. त्याच्या मागील अनुभवाविषयीं विचारणा न होतां तो त्याच दिवसापासून शाळेंत नेमला गेला. परंतु एक महिन्यानंतर शाळेला योग्य न वाटल्यास त्याला रजा दिली जाईल असें बजावण्यांत आलें होतें. तें त्याला मान्यही झालें होतें.

परंतु एक महिन्यानंतर त्याला रजा देण्याच्या ऐवजीं त्याला शाळेंत कायम करण्याचें शाळेचे सुपरिन्टेंडंट याचे बेत चालले होते. त्यामुळें इतर मास्तरवर्गांत नानाविषयीं अनादर उत्पन्न झाला होता. ते त्याचा हेवा करूं लागले होते. पण तिकडे लक्ष देण्याचें नानाला कारणच पडलें नाहीं. कारण शाळेंत काम आणि नंतर दादासाहेबांचा प्रेमळ सहवास यामुळें त्याचा वेळ सुखांत जाई. निर्मलेचा शोध करण्याचा त्यानें एकदां दोनदां प्रयत्न केला होता. परतु त्याला काहीं माहिती मिळाली नव्हती.

नेहमीप्रमाणें आजही ते फिरावयास निघाले होते हें वर आलेंच आहे. बराच वेळ त्यांनीं निरनिराळ्या विषयांवर चर्चा केली. या चर्चेत ते बरेच लांबपर्यंत चालून आले होते हें त्याच्या लक्षांत आले नव्हते, पण त्यांच्या पायांना हा त्यांच्या मनाचा जुलूम सहन झाला नाहीं. विशेषतः दादासाहेब जास्ती दमल्यासारखे झाले होते; म्हणून नानानें पुढें जाऊन आणखी थोडें फिरून यावयाचें ठरविलें. तोंपर्यंत दादासाहेबांनीं तेथेंच त्यांच्या एका ओळखीच्या दुकानांत बसावयाचें ठरलें.

तो सरासरी एक फर्लांग गेला असेल नसेल, डाव्या वळणावर त्याला एक सुंदर रस्ता लागला. रस्त्याच्या दोन्ही बाजूस तीन तीन मजली इमारती होत्या. इमारतींची बांधणी आणि सजावट जुन्या वळणाची होती. परंतु त्यांची नव्या पद्धतीची रंगसफेती त्यांना शोभादा-

यकच होती. खिडक्यावर बहुतेक काचेच्या नळयांचे पडदे सोडलेले दिसत आणि क्वचित् रेशमी कापडानेंही खिडक्या सजवलेल्या होत्या. वाळयाचे पडदेही कांहीं इमारतींच्या खिडक्यावर टांगलेले होते. छताला हंड्या, झुंबरें आणि त्यांत बसविलेले विजेचे गोळे यांनीं त्या इमारतीला अपूर्व शोभा आणली होती. त्याचप्रमाणें भिंतीवर टांगलेले बिलोरी आरसे आणि बहुतेक टिकाणीं मूर्तिमंत प्रणयाच्या धुंद चित्रांच्या तसबिरी लावलेल्या होत्या. जिकडे तिकडे विजेचा चमचमाट आणि विजेच्या पंख्यांचा भूंऽऽ आवाज—दोन्हीं सारख्याच प्रमाणांत दिसत आणि ऐकूं येत होतीं. सुगंधाचा दरवळ, जर मोकळा सोडून पागवला असता तर त्या सबंध शहरभर पसरला असता. पावलाखालची वाट—विजेच्या दिव्यांचीं प्रतिबिंबें तींत दिसत होतीं.

हें जेव्हां त्याच्या दृष्टीस पडलें तेव्हां त्याला दादासाहेबांच्या एका वाक्याची आठवण झाली. "नाना तुम्हीं इथला कुंटिणखाना पाहिला तर तुम्हाला शहाजहान बादशहाच्या जनानखान्याची कल्पना येईल." याच वाक्यावर त्याचें बोलणें थाबलें होतें. ज्यावेळीं त्यानें हें प्रत्यक्ष पाहिलें, त्यावेळीं तो अस्फुट म्हणालाही, "झक् मारतो शहाजहान बादशहाचा जनानखाना."

तो जरा पुढें गेला. नजर अधूनमधून वर खालीं चौफेर फिरत होतीच. (जणू दुसऱ्या कोणच्या तरी देशात उतरला होता तो!) सहज त्याची नजर विजेच्या गोळयांच्या चौकटींत लिहिलेल्या "निमाजान" या अक्षरांच्याकडे गेली.

तो तेथेंच थबकला, आणि स्वतःशींच पुटपुटला "निमाजान! निर्मलेच्या नांवांशीं बराच संबंध येतो कीं—" तो विचार करीत तेथेंच उभा राहिला.

"आप क्या चहाते है जनाब" त्याला कोणी विचारल्याचा भास झाला. त्यानें मागें वळून पाहिलें. त्याला एक भय्या दिसला.

"क्या चाहिये साब?" तो पुन्हा म्हणाला.

"ये है क्या?" नानाच्या मनांत डांचत असलेला प्रश्न बाहेर

पडला.

" आप नही जानते ?" भय्याला आश्चर्य वाटलें. तो पुढें म्हणाला, " अमिरोंका जनानखाना कह दिया जाता है " आणि तो पागल-पणें हंसला.

" और तुम् ?" नानानें विचारलें.

" मै—रखवाला हूं " उभ्या हातातील दंडा जमिनीवर आपटित तो म्हणाला.

नानानें पुन्हा एकदां वर पाहिलें. " निमाजान " हींच अक्षरें जास्ती ठसठशीतपणें त्याच्या नजरेसमोर नाचूं लागलीं.

" निमाजान कहांसे आयी ?"

" ये जाननेसे मेरा क्या फायदा–ड्यूटी और मै–बस्स कामसे अलग मै न हूं और मुझसे अलग ड्यूटी नही हो सकती. कुछ जाननेकी मैंभी कोशिस नही करता—" भय्या सांगत होता.

भय्यालाही हें गौडबंगाल माहीत असूं नये याबद्दल नानाला आश्चर्य वाटलें. आश्चर्यानें मिटलेले हाताचे पंजे विलग करीत " अच्छा " म्हणून तो निघून जाऊं लागला.

" बता दीजिये साब आप क्या चहाते है. आप कोई उनके भाई वगैरे तो नहीं है न?" अडवणकीच्या भाषेत तो बोलूं लागला.

" नही, नही " म्हणून नाना निघून गेला.

भय्याला या त्याच्या एकंदर वर्तणुकीचें आश्चर्य वाटलें तो त्याच्याकडे पहातच राहिला.

# ७

तो त्या आळींतून निघाला; परंतु त्याचें मन तेथून हालेना. कांहीं तरी विचार करून एकदा " निमाजान " हा शब्द उच्चारावा. असे कितीदां तरी त्याला वाटलें.

" निमाजान ही कोण असावी. आपण जिचा शोध करतो ती निमा तर नसेलना? आणि तीच असली तर—" ही कल्पना त्याला अगदीं असह्य झाली. पण जें नको असतें तेंच नेहमीं पुढें नाचत नाचत येतें. या कल्पनेंतून त्याची लवकर सुटका झाली नाहीं. " आणि यांना रखवालदार कशाला लागतो. यांचा पगार कोण देतो इ. " ह्या नमत्या प्रश्नांनीं सुद्धा त्याच्या एवढ्याशा डोक्यात जणू तांडवनृत्य आरंभिलें होतें.

धूसर चंद्रिका पृथ्वीच्या रोमरोमांत भिनली होती. सबंध दिवसाच्या रविराजाच्या उष्म्यानें सुकून गेलेली तिची अंगयष्टि अगदीं निरुत्साही झाली. पण तिला ऐन वेळीं धवल चंद्रिका एखाद्या धन्वंतरी· प्रमाणें लाभली. सृष्टिसतीचा उत्साह तिच्या सागररूपी हृदयात मावेना, म्हणूनच कीं काय तिच्या हृदयसागरांत उत्साहाच्या लाटा उसळत होत्या.

नानाच्या मनातील वावटळ किंचित्काल बंद पडलें. तितक्यांत त्याच्या मनांत एक रम्य कल्पना आली. कल्पनेची परिस्फुटता त्याच्या तोंडावर पण झळकूं लागली. " लबाडे! चंद्रिके, मला कागं नाहीं तूं धन्वंतरी होत? कां असा लपंडाव तूं माझ्याशीं मांडलास? पण खरंच चंद्रिके, तूं कोण माझी! जी माझी–मी समजत होतों ती तरी माझी कुठें आहे—" तो ह्या विचारतंद्रींतच होता.

दादासाहेबांना जातांना हांक मारावयाची हें तो विसरलाच होता. दादासाहेबांना जेव्हा नाना दृष्टीस पडला तेव्हां त्यांनींच त्याला हांक मारून जागें केलें, आणि मग तो एकदम दचकला. " Sorry! Dadasaheb, excuse अं. I forgot " तो म्हणाला.

" हं बर कोठून आलेत फिरून ? "

" हा येथून ! मी सुद्धां फार लांब गेलों नव्हतों. "

दादासाहेबांना नानाला विचार करून घ्यावयाचा होता वाटतें. म्हणून आपलें भाषण त्यांनीं बंद केलें. पण त्यांच्या डोक्यांत एक कल्पना चमकलीच. " नाना कोणी साव चोर तर नाहींना ? काय घ्या या असल्या सडेफटिंग लोकांचें--" पण नानावर असलेल्या शुद्ध मित्रप्रेमानें या कल्पनेची मुळींच डाळ शिजूं दिली नाहीं.

नाना आपल्या खोलींत आला. पादत्राणें काढतां काढतां त्याचे लक्ष समोरच्या खिडकींत गेलें. खिडकींतून चंद्राचीं किरणें आंत आलीं होतीं. त्याच्या मनाला खिडकींत गेल्याशिवाय राहवेना. तो खिडकींत गेला. जड अंतःकरणानें त्यानें चौफेर दृष्टि टाकली.

आकाशांत पूर्णचंद्र चंद्रिकेसह जणूं आनंदानें विहार करीत होता. मघाचीच कल्पना त्याचे डोक्यांत आली. " चंद्रिके, माझ्या खोलींत तूं प्रवेश केलास. मी ग काय तुझं घोडं मारलंय ! पाहिलंस हें माझं हृदय कस करपत आहे तें. तुला कशाला दिसेल बाकी तें. " त्याची दृष्टि चंद्राकडेच होती. त्याला वाटलें चंद्रिकेच्या वतीनें चंद्र आपल्याशीं बोलतो आहे. " वेड्या नाना ! एकाद्या स्त्रीला एकादा आगांतुक मनुष्य आवडत नसला म्हणजे बलात्कारानें कां रम्यता उत्पन्न होते ? " चंद्र जणूं त्याला बघून हंसतच आहे असें वाटलें. हंसतां हंसतांच चंद्र चंद्रिकेसह ढगाच्या पडद्याआड झाला.

त्याला हा उपहास मुळींच सहन झाला नाहीं. शेवटच्या आडपडद्यानें तर त्याला जणूं घायाळ केलें. तो मागें फिरला आणि पलंगाच्या काठांवर येऊन बसला. निमाजानविषयींच त्याचे विचार सुरू झाले.

" निमाजान, तूं कोण आहेस ? कोठून आलीस ? तूं स्वर्गांतली परी आहेस कीं सत्यसृष्टींतील सुंदर तरुणी आहेस ? जादुगारीण किंवा डाकीण तर नाहींसना ? तुझ्याजवळ कांहीं वैशिष्ट्य असल्याशिवाय मला इतकें वेड लागावयाचेंच नाहीं ! "

त्याला झोप केव्हां लागली कोणास ठाऊक !

# ८

तिचें नांव मल्हाराची टेकडी. पेशवाईत बांधलेले तेथें एक मल्हाराचें देऊळ होतें. पेशवाईत बांधकाम झालेल्या इमारतींची व देवळांची कल्पना साधारण येतेच. त्या देवळाशेजारींच, एक उत्तम बाग फिरावयास जाण्याकरितां धवलपूरच्या म्युनिसिपालिटीनें केली होती. तें स्थान खंडोबाच्या जागत्या स्थानासारखें नसल्यामुळें यात्रांचा सुळसुळाट तेथें मुळींच नव्हता. त्यामुळें तेथें नेहमीं रम्य शांतता नांदत असे. टेकडीच्या पलीकडच्या पायथ्याशीं एक तळें होतें. एका बाजूला पाणकणसांचा ताटवा आणि दुसऱ्या बाजूला सुंदर सुंदर कमळांनीं पाण्याच्या वरतीं आपलीं डोकीं काढलेलीं दिसत. गायिकेच्या कंठांतून सुस्वर आलाप बाहेर पडतांना जशा त्यांच्या नाजुक शेलाट्या माना हलतात, तसेंच वाटे तीं कमळें वाऱ्याबरोबर झुलतांना. मनाचा शीणभाग जर कुठें जाऊन घालवावयाचा असला तर मल्हाराच्या टेकडीवर लोक फिरावयाला जात. दिवसभर विचार करून भरून गेलेलीं अंतःकरणें मोकळीं करावयाचीं असलीं तर प्रणयी जोडपीं तेथेंच येत. शाळेमधील मास्तरांच्या डोकेफोडींतून सुटलेले विद्यार्थी संध्याकाळीं खेळण्यास तेंथेंच येत. म्हाताऱ्या माणसांना सुद्धां तेथेंच जावेसें वाटे; पण शक्तीच्या अभावामुळें ते पायथ्याशींच बसत.

आज मात्र पावसाचा रंग असल्यामुळें सरोज–सरल शिवाय तेथें कोणीच नव्हतेसें दिसत होतें.

‘ तुला कसं वाटतं हीं पाणकणसं आणि हीं कमळं पाहून ’ सरोज म्हणाली.

‘ छे बाई ! माझं डोकं या बाजूला नाहीं चालत ’ सरल म्हणाली.

‘ निसर्गानीं सुद्धां पण–विषय करून ठेवले आहेत म्हणावयाचे.’

‘ हें तुमचें गूढ–गुंजन मला समजत नाहीं सरोज.’

'त्यांनींसुद्धां एकदिलानं वागण्याचं आम्हांला शिकवलं नाहीं.' सरलेचें लक्ष तिच्या बोलण्याकडे नव्हतेंच. तिचें लक्ष एका झाडावर बसलेल्या पक्ष्यांच्याकडे होतें.

'अग गेलीं उडून तीं पाखरं.' ती एकदम म्हणाली. सरोजला कांहींच समजलें नाहीं. ती तिच्याकडे नुसती पहावयाला लागली.

'तिथें तीं बसलीं होतीं. चोचींत चोंच घालून चाललं होतं कांहींतरी आणि तो अगोदर उडाला–ती लगेच त्याच्या पाठोपाठ उडून गेली.'

'समजलं मला–दादासाहेबांची तुला आठवण झाली. हो ना!' सरोजचा थट्टेचा स्वर निघाला.

'इश्श! पक्ष्यांत सुद्धां एकदिलानं वागण्याची स्वभावतांच बुद्धि असते.' सरलेनें स्पष्टीकरण केलें 'आठवण कशाला वरचेवर करावी लागते. लग्नाच्या विधीनें एकत्र आलेल्या दोन माणसांच्या परस्परां· विषयींच्या आठवणी कधींच विसरत नाहींत.'

सरोजला कसेंसेंच वाटलें. 'लग्नामुळें जडलेले संबंध विसरत नाहींत—आणि या पक्ष्यांत कुठें लग्न होतात मग–!'

'सरोज–अग एकसुद्धां माणूस आज या टेकडीवर नाहीं.'

'हं.'

'हं काय? आपण काय भुतासारख्या दोघींच आलोंत'

"दादासाहेब बरोबर असते तर–"

"तर काय?"

"तर तूं असं म्हणाली नसतीस."

"मग काय केलं असतं!"

"काय केलं असतं हें मी कसं सांगूं शकेन?"

"नाना आणि तूं रोज येत होता वाटतं इथें!"

सरोज कांहींच बोलली नाहीं. "नाना आणि मी रोज येत होतों फिरायला–" तिचें लक्ष बागेंतल्या गुलाबाच्या ताटव्याकडे गेलें. सायलीच्या कमानींत ती सारखें पाहूं लागली. तिला वाटलं नाना त्या कमानींत आहेच. ती उठून उभी राहून पाहूं लागली.

" कुठें ? तिथें दोघं बसत होता ? "

" हो. " सरोज हंसली.

गतकालच्या रम्य आठवणीनें आनंद होतो. हसूं येतें. पण किती वेळ टिकतें तें ?

" मी एक फूल तोडलं गुलाबाचं-दुसरं तोडायला लागलें. नाना म्हणाला ' कशाला फूल तोडतीस ? ' मी म्हटलें ' एक मला आणि एक आमच्या नानाला.' 'नाना उमललेलीं फूलं घेत नाहीं. मुग्ध कलिकांचें उत्फुलन करणारा आहे नामा.' उत्फूलन या शब्दावर किती जोर दिला त्यांनीं. तें दुसरें फूल तोडतांना गुलाबाचें काट्यांनीं मला चांगलीच जखम केली. गुलाबाचे झाले तरी काटेच ना ते-नानाला दिसूं न देण्याचा मी किती प्रयत्न केला. पण त्याच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं.

" ' सरोज, मी सांगितलें होतं. नको तोडूस फूल म्हणून ' मी हंसलें. आंगठ्याशेजारचें बोट तें. किती वेळ त्यानें आपल्या हातांत धरलें होतें."

तिनें त्या बोटाकडे पाहिलें.

' सरल या बोटावर तुला कांहीं खुणा दिसतात कां ! ' कारण तिला कांहीं दिसत नव्हतें.

' कसल्या खुणा ? बोटावर कसल्या खुणा असतात आणखीन् ? '

' तूं बघ. जास्ती खोलांत शिरूं नये आपण लहान मुलींनी.' आणि ती हंसली.

' छे बाई ! नाहीं दिसत कांहीं—' तिनें बोट जरा उताणें ताणलें.

' शंख आहे गं—दिसतोय मला. '

' ते शंख—चक्र जाऊं दे—शरिरावर झालेल्या खुणा बुजतात—कांहीं काळानं नाहींशा होतात अगदी—पण मनावरचें—हृदयावर झालेले वण—वण नको-ठसे म्हण—ते केव्हांच बुजत नाहींत.' ती पुन्हां त्या कमानी कडे पाहूं लागली. 'ती कमान किती सुंदर होती. तिच्यांतून आंत गेल्यावर गुलाब—तीं फुलें पाहिल्यावर मनांत भरतात. घ्यावीशीं वाटतात. पण—'

' सरोज चल आतां- नाना नाहीं त्या कमानींत.'

सरोजला तिच्या मनकवडेपणांचें आश्चर्य वाटलें.

‘ थांब ना जरा. मला ह्या रम्य निसर्गवास सोडून नाहीं जावंसं वाटत ’

‘ वर बघ–वरती बघ जरा. कमानींत नाहीं तुम्ही आतां. ’

पावसाचे थेंब पडूं लागले. नाइलाजानें सरोज उठली. सरोज आणि सरला निघाल्या आपल्या घरांकडे. कांहीं तरी निमित्तानें सरोज मागें कमानीकडे पाहीच.

---

## ९

गाई, म्हशी सारख्या चर्वित चर्वण करतात तसेंच सरोजचें चालेलें होतें. ती त्या कमानींतला तो प्रसंग सारखा मुद्दाम मुद्दाम आठवूं लागली. ‘ त्यांनीं–आंगठ्याशेजारचें बोट तें–किती वेळ तरी आपल्या हातांत धरलें होतें ’ येथें विचारांची मालिका तुटली होती. परंतु पुन्हां सरोजनें आणि सरलेनें घरचा रस्ता धरला तेव्हां सुद्धां तिला तोंच प्रसंग आठवावासा वाटला.

‘ मीसुद्धां माझ्या रक्तबंबाळ झालेल्या बोटाकडे पहात होतें. ‘ लाजलीस वाटतं सरोज ? ’ तो म्हणाला. ‘ हो–लाजले–इश्य ! ’ मी म्हटलें. ’

हें तिला ज्यावेळीं आठवलें त्यावेळीं ती किंचित हंसूं लागली. सरला समोर पाहून चालली होती तरी सरोजचें गालांतलें हंसणें तिला समजलें.

‘ आज कसल्या एवढ्या गोड आनंदाच्या ऊर्मी उठतात गं–आहे बुवा ऽ ! ’ सरला म्हणाली.

‘ छे तुला नाहीं सांगायचं तें ’ आणि ती जास्तीच हंसूं लागली.

‘ बघ हं. मी बोलणार नाहीं तुझ्याशीं. ’

' नको बोलूंस ! ' तिला राग आला कां काय म्हणून सरोजनें तिची हनुवटी धरून तिचें तोंड आपल्याकडे वळविलें.

' बरं सांगतें–सांगूं का ? '

' नको सांगूस–चल आतां घरीं लवकर–सगळी भिजलीस नां !

' अग हो खरंच–भिजलों हो आपण. '

' पुऱ्या नाहीं भिजलों–तो पाहिलास आमचा अप्पा आला. '

' बरंच लटांबर बरोबर आणलं आहे वाटतं ? '

' बघ कशा छत्रीविक्यासारख्या दोन तीन छत्र्या आणल्यात हातांतून. '

' कवींची कमाल आहे अगदीं ! '

' कविच्च ते. त्यांना जगाची पर्वा नसते. '

' आणि अप्पा काय म्हणतां तुम्हीं त्यांना, चांगलं ' मोहन ' नांव असून–नांव किती तरी सुंदर आहे ! '

' आणि रूपसुद्धा त्याला वावडं नाहीं. '

' म्हणून म्हणतें, अप्पा कसलं नांव एखाद्या आजोबासारखं ! '

' तुला काय करायचं आहे त्याच्या नावांशीं. तुला– '

' हं तुला–पुढें— '

नानांनीं तिला एकदां असंच विचारिलं होतं, ' सरोज काय नांव ठेवलंय ? ' तिनें त्याला असें नव्हतें उत्तर दिलें कीं, ' तुला काय करायचंय माझ्या नांवाशीं–तुला काय आवडतं ? '

' कुन्दा–किती छान आहे नाहीं हें नांव ' तो म्हणाला होता. 'हो' इतकेंच ती म्हणाली होती. ' मला काय तुला नांव ठेवायचा अधिकार हेंच तुला वाटलं ना आतां ' तो म्हणाला होता.

किती गतकालाची स्फुट चित्रें तिला दिसत होतीं.

इतक्यांत मोहनराव तिथें पोहचले.

' बहिणीवर किती प्रेम आहे यांचं ' सरोजच्या मनांत चटकन आलें.

' तुला आम्ही भिजूं म्हणून इतकी काळजी होती तर सख्याकडून

कां नाहीं आणवल्यास छत्र्या. हे काय अजागळासारखं. लोकं परीक्षा करतात. ' सरल म्हणाली.

' सरले, तो जेवायला बसला होता ! '

' वाटेल त्या वेळेला जेवण कसलं ? नेहमीं यांचं पोट जसं पाठीला लागलं आहे. '

' सरले, त्या बिचाऱ्याला आज सबंध बाग उकरायला लावलीस पावसाचा रंग होता म्हणून. आणि तो जेवायला बसला म्हणून बिघडलं कुठें ?—श्रमानें भूक लागते. '

' हीं कामं नेहमीं नसतात अप्पा ! एखाद्या वेळींच असतात. त्या वेळीं जर यांचा उपयोग झाला नाहीं तर नोकर कशाला ? '

' मला जसं वाटलं तसं मी केलं—करूंदे लोकांना परीक्षा. '

सरोज लक्ष लावून सगळें ऐकत होती. ' किती विरोध हा दोघांच्या स्वभावांत ? ' तिला वाटले. ' नोकराविषयीं किती सहानुभूति यांच्या हृदयांत आहे. आणि बहीण भिजूं नये म्हणून स्वतः छत्री घेऊन आले. जग खरोखरच यांना अजागळ म्हणेल. ' असेच तिचे विचार चालले होते.

सरलेला आतां वाटायला लागलें कीं सरोजचें मत आपल्याविषयीं चांगलें झालें नसावें. पण ती गप्पच बसली. प्रथम अप्पा आणि सरला एका छत्रींत होतीं. नंतर—वरील भाषण संपल्यावर सरला सरोजच्या छत्रींत गेली.

' सरोज, तुला वाटलं असेल मी अप्पाला असं कसं बोललें म्हणून. पण याच्या या वागण्यानें ते लोक डोक्यावर बसतात हें त्याला मुळींच कळत नाहीं. '

' हं ' सरोज म्हणाली. मोहन त्यांच्याकडे मुळींच पहात नव्हता.

' तो माझ्यापेक्षां वडील आहे—जास्ती शिकलेला आहे, कबूल आहे मला ! पण व्यवहार नको कां ? '

' खरं आहे. पण मला हें एक्स्प्लेनेशन देण्याची मुळींच जरूर नव्हती,' सरोज म्हणाली. ' आणि जरी वडील असला तरी तूंच व्यवहारांत जास्त मुरली आहेस ! '

‘ अहो ! मोहन–मोहन. ’ कुणीतरी हांक मारली.

मोहन–सरोज–सरला झपाट्यानें घरीं चालले होते. इतक्यांत वळणावर येऊन कुणीतरी त्यांना हांक मारली. मोहननें मागें वळून पाहिलें आणि किंचित् स्मित केलें.

‘ हॅलो मन्दा. हाऊ आर यू ?’ तो थांबून म्हणाला. सरोजनें आणि सरलेनें तिकडेंच पाहिलें. तिनें मोहनला थांबण्याची खूण केली. आणि त्याच्याकडे येत येतच तिनें त्याला आपलें कुशल सांगितलें.

‘ मि.मोहन उद्याच्या अंकात–येत्या १५ तारखेस प्रसिद्ध होणाऱ्या अंकांत एक कविता पाहिजे आहे. तुम्हाला पत्रानें कविता पाठविण्याची लहर लागणार नाहीं म्हणून मी समक्षच येणार होतें तुमच्याकडे; पण आतां अनायासें गांठ पडली, काम झालं. ’

मंदा–मोहन अगदीं सलगीनें बोलत होते. सरलच्या तोंडावर पूर्ण तिरस्कार दिसत होता. सरोजला मन्दाच्या धीट वर्तनाबद्दल बरें वाटत होतें.

‘ अवश्यमेव–बरं कुणीकडे निघाला होता ? ’

‘ तुमच्याकडेच–पण आतां कांहीं जरूर नाहीं.’

‘ वा वा अस कसं ! चला कीं. ’

‘ बरं चला. आमच्या मासिकाबद्दल बोलायचंय् तुमच्याशीं जरा.’

‘ तुमच्या त्या ‘ मनमोहन ’ कवितेनें लोकांना वेड लावलं आहे. ’ जरा वेळ थांबून मंदा म्हणाली.

‘ असम का ! ’ मोहन म्हणाला.

‘ विकास ’ कवितेत तुम्ही जरा जास्त वाहवलांत असं लोक म्हणतात. ’

‘ काव्याचा पूर आला म्हणून तसं झालं असेल कदाचित् मंदा. माझ्या मतें मी स्थिरच आहें. ’

‘ वरच्या खिशांतला हातरुमाल तुम्ही आमच्याकडे कां नाहीं दिलात ? ’

‘ नवपल्लवा ’ नीं माझ्यावर भलताच आरोप केला म्हणून त्यांच्याकडे मला ती कविता द्यावी लागली. ’

सरोजचें घर आलें होतें.

'गुड् बाय् सरल. गुड् बाय् मोहन' म्हणून मंदा जाऊं लागली.

'हें काय मोहन, या कोण आहेत तें नाहीं तुम्ही मला सांगितलें. यांची ओळख द्या कीं करून.'

नाइलाजानें सरोजला थांबावें लागलें. मोहननें सरोजची आणि सरलेची मन्देशीं ओळख करून दिली आणि त्यांच्याशीं मन्देची ओळख करून दिली.

'गुड् बाय् मन्दा' सरोज जातांना म्हणाली.

'डोन्ट फर्गेट युवर् मन्दा नाऊ–गुड् बाय्.' तिनें दोन्ही हात जोडून तिला नमस्कार केला.

'डोन्ट फरगेट युवर मन्दा नाऊ' म्हणतांना मन्देनें गोड हावभाव केले ते मोहनप्रमाणें सरोज–सरलेला सुद्धां फार आवडले.

'नेव्हर, नेव्हर!' सरला सहज म्हणाली.

---

# १०

'भय्या काल कोण आलं होतं रे?'

'मैने उनका नाम पूछा, लेकिन उन्होनें मुझे नहीं बताया.'

'बरं ठीक आहे. पण लक्षांत ठेव त्याच्यावर नीट लक्ष असूं दे.'

वरील भाषण महाराज सुवर्णगिरी यांच्या सुवर्णकुटीमध्यें चाललें होतें. महाराज सुवर्णगिरी यांच्या नांवावरूनच त्यांनीं आपल्या निवासस्थानास 'सुवर्णकुटी' हें नांव दिलें होतें. त्या त्यांच्या नांवावरून ते कोणी श्रीमंत गृहस्थ असावेत हें कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे.

त्यांची ती ' सुवर्णकुटी ' एका लहानशा टेकडीवर एकटीच अशी बांधली होती आणि बागेच्या शोभेमुळेंच त्या कुटीला नैसर्गिक सौंदर्य प्राप्त झाल्यासारखें दिसत होतें. बागेच्या मध्यभागीं एक कारंजें होतें. कारंजाचा हौद गुलाबाच्या फुलाच्या आकाराचा असून कारंजें एका हिंदू स्त्रीच्या डाव्या हातांतून उडत आहे असें दाखविलें होतें. तिच्या उजव्या हातांत एक गुलाबाचें फूल दिलें होतें. हौदावर हिरव्या पोतीचा वेल तयार करून त्याच्यामध्यें निरनिराळया रंगाचे दिवे बसविले होते. त्यामुळें बागेची शोभा रात्रीच्या वेळीं फार चांगली दिसे. बागेंत बऱ्याच ठिकाणीं जाई-जुईच्या कमानी तयार केल्या होत्या. चांदणें असे त्यावेळीं तर त्या बागेची शोभा काहीं अवर्णनीयच दिसत असे. महाराज सुवर्णगिरी रात्रीच्या रम्य वेळीं बागेचा आस्वाद घेण्यास कधींच बसत नसत. मात्र सकाळीं सूर्योदयापूर्वी एक तास व नंतर अर्धा तास ते बागेंत बसलेले असत व तेवढ्याकरिता त्यांनीं कारंजासमोरच एक लतामंडप तयार केला होता. या त्यांच्या मंडपाच्या बाहेर " No admission without permission " अशी पाटी लावलेली होती. ती एवढ्याकरतांच कीं त्यावेळीं त्यांना वरील भाषणांत आलेल्या भय्याची मुलाखत घ्यावयाची असे.

आजसुद्धां महाराज सुवर्णगिरी त्या लतामंडपांत नेहमींप्रमाणें बसले होते. भय्याही तेथें होता. भय्याकडून त्यांना पुरेशी माहिती न मिळाल्यामुळें त्यांची जरा निराशाच झाली. पण या गोष्टींविषयीं जास्त विचार करावयाचा नाहीं, असेंच जणूं ठरवून ते स्वस्थ बसले होते. परंतु मधून मधून त्यांना कांहीं तरी विसरल्यासारखें वाटे व त्यामुळेंच ते किंचित्काल अस्वस्थ होत. ही अस्वस्थता फार वेळ टिकली नाहीं. कारण तितक्यांत दादासाहेब तेथें आले.

दादासाहेब मोठे धूर्त व शहाणे होते. आज सर्वस्वी आपली शाळा महाराज सुवर्णगिरी यांच्या ताब्यांत आहे व पर्यायानें आपली सुद्धां शेंडी त्यांच्याच ताब्यांत आहे हें ते जाणून होते. कारण महाराज सुवर्णगिरींनीं आपली कांहीं इस्टेट अमिराबाद एज्युकेशन सोसायटीला दिली होती. त्या मुद्दल इस्टेटीवर वस्तुतः सोसायटीची मालकी नव्हती

तरी तिचें व्याजच आज जवळ जवळ ४–४॥ हजार होत होतें. अर्थात् ही रक्कम लहान नव्हती. सोसायटीचा उत्कर्ष व्हावा ही दादासाहेबांची मनापासून इच्छा होती आणि त्याकरितां महाराज सुवर्णगिरीशीं ते अतिशय आपुलकीच्या भावनेनें वागत. महाराज सुवर्णगिरीसुद्धां दादासाहेबांना आपले जानी दोस्त समजत. दादासाहेब आले कीं, ते त्यांचें यथोचित आदरातिथ्य करीत. महाराज सुवर्णगिरी यांची प्रथम पत्नी निवर्तली. तेव्हां त्यांनीं दुसरें लग्न करावयाचें नाहीं असें ठरविलें होतें. परंतु दादासाहेब नेहमीं म्हणत, 'महाराज तुमची ही सुवर्णकुटी गृहिणीशिवाय अगदी उदास दिसते. आपण कराच लग्न.'

'छे बुवा! मी लग्न न करण्याचें ठरविलें आहे.'

'मला नाहीं हें बरं दिसत.'

अशाप्रकारें त्यांचे दोघांचे कांहीं ना कांहीं तरी चाले. आज दादासाहेब आले होते. त्याचें नेहमींप्रमाणें स्वागत झालें. आणि बसतां बसतांच दादासाहेब म्हणाले. 'मग कांहीं जमलं कां?'

'अरे! कोण आहे रे? चहा घेऊन ये बरं!' दादासाहेबांच्या स्वागतापैकीं राहिलेला भाग सुवर्णगिरींनी अगोदर उरकून घेतला आणि नंतर दादासाहेबांच्या प्रश्नाकडे तोंड फिरविलें. 'हं काय म्हणालांत? कशाचं?'

'तुम्ही गेला होता त्याचं काय झालं?'

'जाऊं द्या बुवा तो विषय--बाकी जमेल तें–हा पहा तिचा फोटो.' महाराज सुवर्णगिरींनीं एक फोटो दादासाहेबांच्या हातांत दिला. 'मुलगी तरतरीत दिसते नाहीं दादासाहेब.'

'वा–वा! खरोखर मुलगी अगदी शेलकी आहे.'

दोघेही हंसले. इतक्यांत चहासाहित्य एका ट्रेमधून घेऊन एक गडी आला. त्यानें तो ट्रे जवळच्या टेबलावर ठेवला. दादासाहेबांनीं चट्दिशीं दोन कप भरले. आणि नाना आलेला पाहिला म्हणून तिसऱ्या कपात किटलीच्या तोटीची धार धरली.

'यावं नानासाहेब,' गिरी म्हणाले.

' हं करा सुरवात आतां नानासाहेब, ' दादासाहेब बशींत चहा ओतीत असतांना नानाकडे पहात म्हणाले.

' माफ करा–नको मला चहा—' नाना विनयानें म्हणाला.

' हें पहा नानासाहेब, चहा घ्यायला तुम्ही इतकें लाजतां, मग उद्यां गिरींच्याकडे जेवायला कसें येणार ? '

' त्यावेळीं पहातां येईल. '

' पण आतां वेळ आली आहे ती नको साजरी करायला ? ' दादासाहेबांनीं चहाचा एक घोट घेतला, ' आणि हा पाहिलांत कां फोटो ' असें म्हणून एक फोटो नानासाहेबांच्या समोर धरला.

गिरींच्या मनात दादासाहेबांनीं इतका उतावीळपणा करूं नये असें होतें. दादासाहेबांनीं नानाच्या समोर जेव्हां तो फोटो धरला तेव्हां गिरींच्या आणि नानाच्या मुखावर तिरस्कार दिसत होता. पण दोघांच्या तिरस्काराचे अर्थ भिन्न होते. हा विषय जास्ती फोफावून त्याची चर्चा होऊं नये म्हणून गिरी म्हणाले, ' दादासाहेब, हीं तिकिटें माझ्या एकट्या-करतां नाहीं आणलीं. '

पण दादासाहेबांनीं त्यांच्या बोलण्याकडे मुळींच लक्ष दिलें नाहीं.

' हें यांचें भावी द्वितीय कुटुंब बरं कां ! ' ते म्हणाले.

नानानें तें पुरतें ऐकलेंही नाहीं. तो फोटो पाहिल्यावर त्याच्या अंतःकरणाला निराळ्याच संवेदना होऊं लागल्या. त्या सर्वांना दाबीत असतांना त्याच्या चेहऱ्यावर अतिशय कष्टीपणा आला होता. तशा स्थितींत त्यानें उच्चारिलेले ' अस्सं ! ' हे शब्द अतिशय कठोर होते. परंतु ते त्यावेळीं कोणासही ऐकूं आले नाहींत.

जरा वेळानें नाना आणि दादासाहेब बाहेर पडले.

महाराज सुवर्णगिरींच्या बंगल्यांतून ते निघाले ते आपआपल्या घरीं गेले. रस्त्यांत कोणी कोणाशीं बोललें नाहीं. नानाच्या मनाची झालेली स्थिति दादासाहेबांच्या लक्षांत आली; पण असें कां व्हावें ह्या शोधांतच ते आपल्या घराशीं आले. घराच्या पुढच्या दालनांत एक पत्र पडलें होतें. ते दादासाहेबांच्या मेहुण्याचें होतें.

धवलपूर.

ती. रा. रा. दादासाहेब यांना नमस्कार वि. वि.

चि. सौ. सरला रविवारीं तिकडे येणार आहे. तिच्याबरोबर तिची मैत्रिण सरोजही येणार आहे. आपलें पत्र आलें आणि तेव्हांपासून तिचें आपलें हें टुमणें माझ्या पाठीमागें. ‘ छे गडे अप्पा ! जातें मी, ‘ तिकडे ’ त्रास होतो सगळा. ’ मी म्हणतों ‘ तिकडे ’ त्रास कशाचा खानावळींत चारदां फीस्ट्स् मिळतात. तूं एकदां तरी देतेस कां त्यांना तशी फीस्ट?’ यावर एका विशिष्ट तऱ्हेनें मान वेळावून ती हंसते. अन् ‘ पुरे ! पुरे ! ’ म्हणते.

बरें असो ! कळावें, आपला,

अप्पा.

नाना तेथेंच होता. सरोज येणार यामुळें त्याच्या मनाला जास्तीच त्रास होऊं लागला. दादासाहेबांची अशी अपेक्षा होती कीं पुढच्या विनोदी ओळीवर नाना कांहीं तरी टीकात्मक बोलेल; परंतु तसें न होतां उलट नानाच्या मनाची जास्तीच चलबिचल झालेली पाहून दादासाहेब त्याच्यावर चिडलेच होते. परंतु दुसऱ्याच क्षणीं त्याच्या विमनस्कतेबद्दल त्यांना सहानूभूति वाटूं लागली. आणि त्याला त्याच्या विमनस्कतेचें कारण विचारून पहावें, म्हणून त्यांनीं त्याच्याकडे नजर टाकली.

पण ‘ बरं दादासाहेब ’ असें म्हणून नाना निघून गेला. नाना गेल्यावर दादासाहेबांचें मन निराळयाच भावनेनें प्रेरित झालें. सरला दोन तीन दिवसांत येणार या कल्पनेनें त्यांना आनंद झाला. पण तिच्या बरोबर तिची मत्रीण येणार या विचारानें त्यांना आश्चर्य वाटलें. कारण दादासाहेबांना सरलेची कोणी सरोज या नांवाची मैत्रीण आहे, हें माहीत नव्हतें. त्यांचें लग्न अगदीं जुन्या पद्धतीनें झालें होतें आणि पहिल्या खेपेला सुद्धां पाठराखीण म्हणून कोणीही आलें नव्हतें आणि आतां येणारी ही सरोज कोण ?

“ सरला आली म्हणजे आपली ही सगळी अव्यवस्था पाहील आणि म्हणेल, ‘ पुरुषच तुम्ही. घरांत केरांत देखील बसाल; पण घरांतल्या टाप-

टिपीची कल्पनासुद्धां नाहीं शिवायची मनाला. कधीं आमचे हिंदु पुरुष घरव्यवस्थेंत टापटीपशीर होतील कोण जाणे?' पण नस्त या खेपेस तिचें असलें भाषण आपण ऐकणारच नाहीं. अजून दोन दिवस अवधी आहे. तेवढ्या वेळांत आपण ती व्यवस्था करूं."

असल्या मनोराज्यांत स्वारी दंग झाली होती.

ॐ ॐ ॐ ॐ

नानाच्या मनाची स्थिति मात्र चमत्कारिक झाली होती. तो कसा-बसा खोलींत येऊन बसला. 'सरोज! दादाकाका संपत्तीला भुलून त्या सुवर्णगिरीच्या गळयांत बांधणार ना तुला? अन् तुला सुद्धां तें स्थळ पसंत पडल्यासारखं दिसतं, आणि म्हणूनच तूं अमिराबादेस येणार.' नाहीं नाहीं ते विचार त्याच्या मनांत येऊं लागले. अगदीं हताश होऊन त्यानें दोन्ही हातांच्या तळव्यांत आपलें डोकें घट्ट धरलें.

काळजीनें ग्रासलेला त्याचा चेहरा अगदीं खिन्न दिसत होता. मुखावरचें मूळचें तेज आज कुठें लोपलें होतें कोणास ठाऊक? एक क्षण देखील त्याचे विचार त्याला सोडीनात.

'नाना, तूं कां सरोजची काळजी करावीस? तिची काळजी घेण्यास तिचे आईवडील नाहींत काय? वास्तविक ती तुझी कोण? आणि जरी कोणी असली तरी ज्या बाबतींत तूं जबाबदार नाहींस ती बाबत तूं मुद्दाम होऊन आपल्या गळयांत कां घ्यावीस? त्यांतून लग्नासारखी गोष्ट—परिणामीं जी क्वचितच योग्य ठरते—अशा गोष्टींत तूं कशाला मन घालतोस? जाऊं दे ना! उलट—कसचें—अशा बाबतींत कांहीं न केलेलें बरें!'

अशा परस्परविरोधी विचारांच्या तडाक्यांत नाना सांपडला होता. कांहीं निश्चय करून तो तसाच उठला, कोटांतील फाउंटन काढलें आणि पत्र लिहिण्यास त्यानें सुरवात केली—

अमिराबाद.

आशिर्वाद वि.

—पुढें काय लिहावें हें त्याला मुळीं सुचेनाच. फाऊंटनपेन हातांत धरून तो किती वेळ तरी उगीच बसला होता.

ॐ ॐ ॐ ॐ

साध्या क्षुल्लक गोष्टींचा परिणाम किती भलताच होतो, त्यामुळें आयुष्याला किती निराळेंच वळण लागतें आणि सगळेंच किती विलक्षण होतें, याचा अनुभव सरोजला पूर्ण आला होता.

'कसला होता तो फोटो कोण जाणे?' असें वारंवार तिला वाटे; पण पुढें पुढें तर तिला काहींच सुचेनासें झालें. तिची प्रकृति अगदीं अशक्त होत चालली. दादाकाका तिकडे बिलकूल लक्ष देत नसत. तिच्याशीं, त्यांनीं जणूं अबोलाच धरला होता. तिने सुवर्णगिरीशीं लग्न करण्याचें नाकारलें होतें. माडीवरून खालीं उतरले कीं, त्याचा नुसता जळफळाट व्हावयाचा. सरोजला त्यामुळे अतिशय गुदमरल्यासारखें होई. तिच्याविषयीं सहानुभूतीचे शब्द बोलणारी काय ती एक सरला. पण तीही अलिकडे सरोजच्या घरीं जितक्यास तितकीच येई. आणि काकूंची भाषा म्हणजे या प्रकारची. "सरोज, काय केलंस हें तिकडे पाहिलंस ना कसं झालंय तें?" याला ती नेहमीं नेहमीं काय उत्तर देणार! तिनें एकदां सांगितलं होतें 'काकू! मला मुळीं लग्नच नाहीं करायचें—आणि आपल्या धर्मांत मुली एकदाच लग्न करतात ना? काकू, तुला नाहीं वाटत तुझी मुलगी सावित्रीसारखी व्हावी? कसं सांगू तुला काकू—' असें म्हणून ती रडायला लागे. यावर काकू कांहींच बोलत नसत; पण त्यांच्या मनाला वाटे कीं, 'कोण हिच्या मनात सत्यवान आहे कोणास ठाऊक?' तिला एकदां स्पष्टच विचारावयाचं त्यांनीं मनात आणलें. परंतु 'ती मोकळ्या मनानें आपल्याजवळ बोलेल कां सगळें' अशीही शंका त्यांच्या मनात आली. नंतर त्याना एक निराळीच युक्ति सुचली. त्यांनीं सरलेला बोलावणें पाठविलें. सरोजनें काकूंना पुष्कळ सांगून पाहिलें. 'काकू, सरल यायची नाहीं. उगीच कशाला बोलावतेस तिला. दादाकाका तिला काय काय बोलले ते—येईल कशी ती मग! मी केव्हां टळेन अस्सं काकांना झालं आहे. त्याच मार्गांत आहे म्हणावं मी—'

किती वैतागल्यासारखें बोलत होती ती! अगोदर पांढरें पडलेलें तिचें मुखमंडल आजि सुकलेले डोळे—त्यांत वैतागाची भर—त्यामुळें

ती अतिशय दीन आणि निराश दिसत होती. काकूंच्या तोंडून फक्त 'हें काय असं बोलावं बाळ' इतकेच शब्द बाहेर पडले. आणि त्या गहिंवरल्या.

काकूंनीं सरोजला घट्ट हृदयाशीं धरलें—आणि कोरड्या भग्न झालेल्या तिच्या हृदयाला पुन्हां आर्द्रता आणण्याकरतांच कीं काय त्यांच्या डोळ्यांतून अश्रूंचे सर तिच्या डोक्यावर ओघळूं लागले. सरोजलादेखील दुःखावेग असह्य झाला. तीही रडूं लागली. कितीवेळ तरी त्या एकमेकींना सोडीनात.

---

# ११

मनुष्याला एखादा जिव्हाळ्याचा प्रश्न सोडवावयाचा असला म्हणजे त्याचें सारें चित्त–वित्त त्या प्रश्नाकडे खेचलें जातें व प्रसंगीं त्या गोष्टीकरतां आपल्या सर्वस्वाचा होम करण्यास देखील तो मागें पुढें पहात नाहीं.

आज दोन तीन महिने दादाकाकांच्या पुढें सरोजच्या लग्नाचा प्रश्न होता. त्याचा तपशील काकांच्या मतें समाधानकारक नव्हता. महाराज सुवर्णगिरीचें स्थळ ९९ टक्के चांगलें होतें, अशी त्यांची पक्की खात्री होती. फक्त 'बिजवर' एवढाच दोष त्यांच्यांत कोणी काढला असता असें त्यांचें म्हणणें होतें. पण 'बिजवराशीं लग्न केल्यानंतर मुलींचे संसार होत नाहींत कां?' अशी विचारसरणी लावून तोही दोष नाहीं असें दाखविण्याचा ते प्रयत्न करीत होते. आणि त्याकरतां त्यांनी पुराव्याची पण योजना करून ठेविली होती. जेव्हां काकूंशीं चार शब्द तुटक बोलण्याची पाळी येई त्यावेळीं एखादा पुरावा ते चट्कन पुढें करीत, 'काय गं आमची आत्या लग्नांत काय वयाची होती?

आणि तिच्या यजमानांचें वय काय होतें? मग झालाच कां नाहीं त्यांचा संसार. चार मुलं बाळं. आतां तो बंड्या चांगला रांकेला सुद्धां लागला. आणि आत्या सुद्धां नानासाहेबांच्या अगोदर भरल्या कपाळानें गेली!' काकूंना त्यांच्या बोलण्यांत मिसळावें लागेच. त्या होकारच देत असत आणि क्वचित् प्रसगीं 'आमच्या माहेरीं आमच्या शेजारीं जोशी नांवाचे एक चांगले सुखवस्तु गृहस्थ रहात होते. त्यांचं तरी काय? चवथं लग्न-पण बायको कशी लक्ष्मी मिळाली होती त्यांच्या संसाराला; पण तिचं नशीब फुटकं, ते जोशी बिचारे लवकर वारले. त्यांना तरी छातीचा विकार कां असावा. मी म्हणतें—' अशा तऱ्हेनें त्याही काकाची मधून मधून री ओढण्याचा प्रयत्न करीत.

सरोजच्या हट्टामुळें काकांनीं गिरींना नकारार्थी पत्र पाटविलें होतं, त्याला चार पांच दिवस झाले होते.

आज दुपारच्या वामकुक्षींतून काका नुकतेच उठले होते आणि त्यांनीं आपला साडेतीन फुटी देह आराम खुर्चीवर टाकला होता. त्यांचें त्यांनाच कांहीं वाटलें आणि त्यामुळें त्यांच्या चेहऱ्यावर एक प्रकारची म्लानता आली होती.

'पोरीच्या डोक्यांत काय चाललं आहे कोणास ठाऊक? महाराज सुवर्णगिरीसारखं स्थळ आम्हांला मिळाल्यावर आमच्या लौकिकांत भर पडून सरोजला सुख लागलं असतं! पण योगायोग निराळाच दिसतो. पोर मात्र वाळत चालली आहे. आणि तिला जर या गोष्टींत आनंद वाटत नाहीं तर ती गोष्ट तिच्या पदरात बांधण्यांत काय फायदा आहे? रडक्या शिलेदारांना पंचहजारीचा काय उपयोग?'

आज हें असें उलटे वारे वाहूं लागलें होतें, इतकें खरें. सरोज त्यांची फार लाडकी होती. तिच्याबद्दल त्यांना यत्किंचित्‌ही प्रेम न वाटणें आश्चर्याचें झालें असतें.

वरील विचारानें ते अगदीं अस्वस्थ झाले. ते खुर्चीवरून उठले. आणि खिडकींत गेले. सरोजला बोलावून तिची माफी मागावी म्हणून त्यांनीं तिला हांकही मारली.

' अर्र्र्र ' हांक मारल्यानंतर त्यांच्या तोंडांतून उद्गार निघाले. त्यांत भाव हा होता कीं ' त्या पोरीपुढें मी दीनासारखा उभा राहून तिची क्षमा मागूं ? कधीं तरी शक्य आहे कां ?'

इतक्यांत जिन्यांत कोणाचीं तरी पावलं वाजलीं. सरोजच आली असावी असा त्यांनीं तर्क केला. तिच्याशीं आतां काय बोलावें हेंच मुळीं काकांना सुचेना. त्याचा चेहरा अगदीं कावराबावरा झाला; पण काकांचा अदमास सपशेल चुकला होता. कारण काकूच हातांत सरबताचा ग्लास घेऊन आलेल्या त्यांच्या नजरेस पडल्या. आपण डॉक्टरकडे औषध घेण्यास जावें, ' औषध कडूच असणार ' असें साधारण नियमानें समजावें, परंतु तें गोड निघावें. आणि मग जें वाटतें—तसेंच काकांचें झालें. काकूंच्या हातात सरबताचा ग्लास पाहून तर त्याची कळी खुलली, आणि ते चूळ भरण्याच्या उद्देशानें इकडे तिकडे पाहूं लागले. जिन्यांत ठेवलेलें तांब्याभांडें काकूंनीं चटकन् पुढें करतांच काकांना काय वाटलें कोणास ठाऊक ? एवढ्या म्हातारपणीं सुद्धां त्यांना काकूंना जवळ झोपाळ्यावर बसवावें आणि खूप मोटा झोका घ्यावा असें वाटलें असावें. कारण ते लगेच झोपाळ्यावर जाऊन बसले आणि काकूंनीं पुढें केलेला पाण्याचा पेला आपल्या हातात घेत घेत म्हणाले, ' बस कीं—कां अजून लाजतेस ? '

' इश्श ' काकू सुद्धां एखाद्या अठरा वर्षे वयाच्या नवविवाहित तरुणीसारख्या चटकन् बोलून गेल्या. काकांच्या या गोड भाषणानें त्यांना अमित आनंद झाला होता यांत संशय नाहीं.

चूळ भरून काकांनीं ती खिडकींवाटें अंगणांत थूंकून दिली, आणि सरबताचा पेला घशाखालीं ओतल्यावर ते काकूशीं बोलूं लागले.

' हें बघ, बस ना ' काका पुन्हां म्हणाले. काकूंनीं एक साधी खुर्ची जवळ ओढून घेतली आणि तीवर त्या बसल्या. आतां अगदीं स्थिरस्थावर झालें आणि बोलण्यास मुळींच हरकत नाहीं अशीच स्थिति निर्माण झाल्याचें वाटून काकांनीं मुख्य विषयाला सुरवात केली.

' हें बघ—सरोजच्या बाबतींत काय करावं हेंच अलीकडे मला सुचेनासें झालें आहे. तुझ्याजवळ सांगितलें असेल तिनें सगळें.'

काकूंना या बोलण्याचें तर फारच आश्चर्य वाटलें. आकाशांत मेघांचे दाट समुदाय जमलेले असावेत, विजेचा कडकडाट सारखा चालू असावा आणि मधूनच मेघांनीं सिंहगर्जना करून टापूंतील प्रदेश भयभीत करून सोडावा आणि आतां निमिषार्धांत मेघांची मुसळधार कोसळणार असें वाटावें आणि त्याच निमिषार्धांत आकाशांत एकही ढग दिसूं नये! या दोन परिस्थितींत जितकें अंतर तितकेंच दादाकाकांच्या जेवणापूर्वींच्या आणि जेवणानंतरच्या मनोभूमिकेंत अंतर पडलें होतें. सरोजनें एकदां गिरींच्या स्थळाबद्दल नापसंती दर्शविल्यापासून आतांपर्यंत कोणालाही काकांच्या तोंडून इतके गोड शब्द ऐकावयाला मिळाले नव्हते. काकूंना तर–आज आपल्या कानांत कोणी अमृतच ओतीत आहे असें वाटलें आणि वर येत असतांना त्यांची जी गांगरल्यासारखी स्थिति झाली होती ती एकदम नाहींशी झाली आणि त्या अगदीं आनंदित दिसूं लागल्या.

काकू कांहींच बोलत नाहींत असें पाहून काका पुन्हां म्हणाले, 'मग अखेर तिनें तुझ्याजवळ कांहीं सांगितलें कां नाहीं?'

'ती कसलं सांगतीय; पण तिचें लग्न लांबणीवर पडलें आहे म्हणून बरं झालं. नाहीं तर आपल्याला पश्चात्ताप करावा लागला असतां–' काकू म्हणाल्या.

'आपलं सोडून दे–आपण आतां नादच सोडलाय त्या स्थळाचा. तिच्या मनांत काय आहे तें सांग!'

'तो मनुष्य फार वाईट चालीचा आहे—' काकूंनीं आपलेंच बोलणें पुढें चालू ठेवण्याच्या उद्देशानें भाषेला वळण लावलें.

'तुला विचारतों त्याचं उत्तर दे' काका म्हणाले.

'वळणावर जायचंच ते' काकूंच्या मनांत हा विचार आल्याशिवाय राहिला नाहीं. आतां जास्त वाढवण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें वाटून काकू म्हणाल्या. 'हो–खरंच पण–हं सांगतें. तिच्या मनांत नानाशीं लग्न करावयाचें आहे.'

'नाना कोण?' काकांचे डोळे तेवढ्यांत लाल झाले. दारु-

बाजाच्या डोळयांतला निर्जीव आणि भेसूर रक्तवर्ण नव्हता तो; पण सळसळणाऱ्या रक्ताची चकाकी त्यांत होती. काकू घाबरल्या. पण त्यांच्या लाल डोळयाला—तो जमदग्नीचा अवतार पाहून त्या खुर्चीसह दोन हात बाजूला सरल्या.

' कार्टीनं काय काय चाळे मांडलेत कोण जाणे ? अन् तुला सांगितलं होत ना—त्या नान्याचें माझ्यासमोर पुन्हां नांव काढूं नकोस म्हणून ?'

हें असें होणार हें काकूंनीं जणूं वर्तवलेंच होतें. क्षणापूर्वीच्या भाषणात जितकें माधुर्य होतें, तितकाच कठोरपणा क्षणानंतर काकांच्या भाषणांत आला होता. त्यांना या गोष्टीचें विशेष आश्चर्य वाटलें नाहीं. त्या उलट जास्तीच धीट बनल्या.

' आपण विचारलं म्हणून . . . . .'

' एक शब्द बोलूं नकोस . . . . .'

इतक्यांत पोस्टमन आला. त्यांनीं काकांच्या नावांचा पुकार केला. काकू चटकन उठून खालीं गेल्या, आणि पोस्टमननें दिलेलें पत्र वर घेऊन आल्या. काकांनीं तें पत्र ओढूनच आपल्या हातांत घेतलें आणि वाचण्यास सुरवात केली.

अमिराबाद.

न. वि. वि.

—उजव्या कोपऱ्यावरचें अमिराबाद आणि त्याच्याखालीं तारखेची ओळ सोडून नुसतें नमस्कार वि. वि. आणि तें सुद्धां प्रत्येक शब्दाच्या पहिल्या अक्षरांत पाहून काकांनीं आश्चर्यानें मान हालविली. असल्या मायन्यांत त्यांना आलेलें पत्र आजच त्याच्या दृष्टीस पडत होतें पण तिकडे जास्ती लक्ष न देतां मायन्याखालील ओळींकडे त्यांनीं आपली दृष्टि लावली.

' महाराज सुवर्णगिरी यांना आपण आपली मुलगी देऊं केली होती. तिचा फोटो आपण त्यांना दिला होता; पण स्वतः पहाण्याची इच्छा दर्शविली असतांना आपण त्यांना आमंत्रण केलेत. यावरून हें सिद्ध होतें कीं, महाराज सुवर्णगिरी यांचा होकार मिळतांच आपण उभयतांच्या लग्नाला सिद्ध आहांत.

इतकें असतांना आपल्या परवांच्या पत्रांत आपण त्यांना स्पष्ट नकार कळवितां याचा अर्थ काय? हा काय पोरखेळ आहे काय? सुवर्णगिरीचें लग्न ठरलें आहे, असें आज सबंध अमिराबादेंत झालें आहे.

हा अब्रूचा प्रश्न आहे. सुवर्णगिरींच्या पायाशीं आज या घटकेला शेकडों मुली लोळण घालून येत आहेत, हें खूप लक्षांत ठेवा. पण आपल्या मुलींशीं लग्न करण्यांतच त्यांच्या लौकिकाला भूषण आहे.

यांत आपल्याला सुद्धां भूषण आहे. आपल्याही अब्रूला यांत गुंजभर मांस चढणार आहे. पण आपल्या अब्रूचा आम्हांला विचार करणें कर्तव्य नाहीं.

तरी या बाबतींत काय तो खुलासा ताबडतोब व्हावा.

दादासाहेब कलावंत,
एक हितचिंतक.

अगदीं निःशब्द स्तब्धतेंत दोन तीन मिनिटें गेलीं. काकांना रागाचा पुन्हां झटका आल्यासारखा झाला. आणि ते मोठ्यानें सगळ्यांना ऐकूं जाईल अशा बेतानें बोलूं लागले.

"कार्टीला म्हणावं चालती हो. ज्यांना स्वतःच्या बापाच्या अब्रूची चाड नाहीं, त्या असून नसून सारख्याच—चालती हो म्हणावं तिला. कर एकदां काळं आणि माझ्या पुन्हां दृष्टीस पडूं नको."

आतां त्याच्यासमोर कुणीच बोलणें शक्य नव्हतें. काकू तशाच उठून खालीं गेल्या.

# १२

काकाचा मर्मभेद करणारा वाक्स्राव सरोजच्या कानांवर आला होता. त्याचे ते भेदक शब्द ' कार्टीला कर म्हणावं काळं. मला पुन्हां तोंड दाखवूं नकोस ' तिच्या मनांत तेवढ्यां वेळांत कितीदां तरी आले. तिचे विचार म्हणजे हेच. दुसऱ्या विचाराच्या वाऱ्यालासुद्धां तिचें मन उभें राहीना. या वरील वाक्याला जोडूनच ' काकांना मी इतकी कां नको झालें ? झालें असले तर कुठें जाऊं मी आतां ? ' हीं वाक्यें नुकतींच तिच्या मनांत घुटमळूं लागलीं होती. काकांचें भाषण ऐकून ती आपल्या खोलींत रडतच बसली होती. सरल तिला सांगून दमली. ' सरोज ! रडतेस काय असली ? छे ग ! रडण्यानें दुःखभार हलका नाहीं होत, ' सरल म्हणाली.

' होय सरल ! काय करूं मी आतां ? नाजुक धाग्यांची वीण उकलतांना तुटतेच ती. त्यातून एकाची वीण दुसरा उकलायला लागला तर या गोष्टी मुद्दामच होतात. '

' सरोज, चार दिवस माझ्या घरीं चल. म्हणजे तुला बरं वाटेल.'

' काकाच्या सानिध्यांत मी इतक्या दिवस नाहीं कां आनंदांत राहिलें. काकांचं माझ्यावर किती प्रेम होतं सरल... हल्लीं...... ' बोलवेनाच तिच्यानें पुढें.

' पण तूं रडूं नकोस गडे ! नको ना रडूंस ! ' सरल तिचा हात आपल्या हातांत घेत म्हणाली. सरलेला सुद्धां गहिंवर आलेला होता. त्यामुळें तिचाही घसा जरा घोगरा झाला होता.

सरोजच्या तत्क्षणींच लक्षात आलें. इतका वेळ खालीं घातलेली मान तिनें वर केली, आणि तिची शंका खोटीच ठरली. ' आपल्या करतां सरलेला सुद्धां किती वाईट वाटतें. आणि काकांना... जगांतला बोज जातो त्यांचा .. ' तिच्या मनांत हा विचार आलाच. ' सरल '

ती म्हणाली, ‘ सरल, नाहीं रडत मी आतां... आणि तूंही—’

कसा बसा तिनें आपला दुःखावेग आंवरला. शून्य दृष्टीनें ती समोरच्या खिडकींतून बाहेर पहात होती. ‘ असाच दुःखांत जायचा आजचा दिवस ’—ती मध्येंच म्हणाली.

सरलेनें तिच्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें. सरोजचें तिच्याकडे लक्ष नव्हतेंच. म्हणून ती म्हणाली, ‘ सरोज ! ’

जी दृष्टी तिनें खिडकीबाहेर लावली होती त्याच दृष्टीनें तिनें सरलेकडे पाहिलें. छे ! किती भेसूर होती तिची दृष्टि ! डोळे पाण्यानें भरलेलेच होते. डोळयांतून गालांवर आलेले ओघळ नुकतेच सुकले होते.

‘ काय ? ’ ती म्हणाली.

‘ अशी निराश कां होतेस ? ’ सरल म्हणाली.

‘ सरल आजचा तोच दिवस. ज्या दिवशीं नाना घरांतून बाहेर पडला. तोच दिवस आजचा... असाच जायचा दिवस ! कावांना नानाची आठवणसुद्धा होत नाहीं. ’

‘ सरोज, नको त्या दिवसांची आठवण काढूंस. गत गोष्टींचा विनाकारण उहापोह करण्यांत कांहीं अर्थ असतो कां ? ’

‘ नसतो असं कसं तूं म्हणतेस ? नानाची आटवण झाली म्हणजे मला किती बरं वाटतं ! कुठें असेल गं तो आतां ! ’

‘ वेड लागेल अशानें तुला. ’

‘ मग तर मला फारच बरं वाटेल. माझ्या वेडांत नानाला मी एक क्षणभरतरी विसरेन कां ? ’

सरोजनें पुन्हां आपली दृष्टि खिडकीकडे वळविली. कुठेंतरी एकाच वस्तूकडे ती टक लावून पहात असावी. असाच तिच्या दृष्टीचा रोख होता.

‘ काय पहातेस सरोज ’ सरलेनें विचारलें.

‘ काय पहायचं—कांहीं नाहीं पहात. ’

इतक्यांत काकू खोलींत आल्या. सरोजनें त्यांच्याकडे मुळीं पाहिलेंच नाहीं. उलट त्या आल्या त्याच्या उलट बाजूला तिनें आपलें तोंड फिरविलें.

काकू तिच्याजवळ गेल्या. तिच्या तोंडावरून त्यांनीं आपला हात फिरविला. तिचें कपाळ त्यांना किंचित् गरम लागलें.

'सरोज, तुझं कपाळ दुखतंय? तापलंय पण तें—' सरोज कांहींच बोलली नाहीं. काकूंना कसेंसेंच वाटलें.

'सरोज' त्या पुन्हां म्हणाल्या, 'कां बाळ, तापलयं तुझं डोकं?'

'छे गं काकू, मला काय होतंय? चांगली आहे मी!' सरोज म्हणाली. यावेळीं तिनें किती कृत्रिम प्रसन्नता आणली होती! पण ती फार वेळ टिकली नाहीं. तिनें काकूंच्याकडे पाहिलें आणि तिला हुंदका आवरेनासा झाला. तिनें मनमुराद रडण्यास सुरवात केली.

सरलेला आता रहावेना. ती म्हणाली, 'तुम्ही दुसऱ्याला कांहीं किंमत असते अस मानण्यास मुळींच तयार नसता. काकांनीं आतां काय कांगावा केलाय. तुम्हाला ती जड झाली असली तर येईल चार दिवस माझ्याबरोबर.'

'छे! सरला तुझ्या इथं मी किती दिवस राहणार?' सरोज म्हणाली. काकूंना या बाबतींत काय करावें हें मुळींच समजेना. म्हणून त्या अगदीं गप्प बसल्या होत्या.

'सरोज, तूं यावेळीं बोलूं नकोस. येथून चार दिवस बाहेर गेल्या-शिवाय तुझी प्रकृति नाहीं सुधारायची आणि काकाच्या घरांत समाधान नाहीं नांदायचं आणि हें बघ, परस्पर परस्परांवर नाखूष असल्यामुळं घराचं घरपण रहात नाहीं सरोज! तूं येण्याचं कबूल केलं आहेस परवां माझ्याजवळ.'

'सरले, मलासुद्धां वाटतं कुठं तरी चार दिवस दूर रहावं म्हणून. माझ्या आयुष्यांत असला प्रसंग येईल याची कल्पनासुद्धां नव्हती. विचित्र दैवयोग—' सरोजचें बोलणें सरलेनें ऐकलें तिला यावेळीं त्यांवर कांहींच उत्तर द्यावयाचें नव्हतें. ती काकूंना म्हणाली. 'काकू जा, काकांना सांगा, सरोज माझ्याबरोबर चार दिवस अमिराबादेस येणार आहे म्हणून. तिला या घरांत रहाणं दिवसेंदिवस अगदीं अशक्य होणार आहे. त्यांतून काकांच्यासारख्या आततायी........'

सरोजनें तिच्या तोंडावर हात ठेवला. उद्देश हा कीं, यापुढें काकांच्या बाबतींत तरी तिनें जास्ती बोलूं नये. पण त्या हाताचा कांहींच उपयोग झाला नाहीं. तिनें वाक्य पुरें केलेंच; पण काकू वरती परत जाऊन त्यांना विचारायला तयार होईनात. एक तर सरोजचा वियोग त्यांना सहन होणार नव्हता. घरांत त्या दोघीच असल्यामुळें सरोजचा बराच काळ जाई, आणि सरोजचा थोडा फार तरी गाजावाजा असल्यामुळें काकूंना करमे. ती शाळेंत जाई तेवढा वेळ काकू वाचण्यांत वगैरे घालवीत. त्यामुळें तिचें शाळेंत जाणें किंवा नानाबरोबर रोज सकाळीं फिरायला जाणें त्यांना जाचक होत नव्हतें. आणि आतां तर तिला सुट्टी झाली असल्यामुळें तिचा चिरपरिचय काकूंना लाभे व त्यामुळें त्यांचा सगळा दिवस फार मजेंत जात असे.

कधीं कधीं नानांची आठवण त्यांना होई. त्यामुळें त्या जरा खिन्न होत. पण सरोज दृष्टीस पडली कीं, मुखावरची खिन्नता त्या तात्काल कमी करण्याचा प्रयत्न करीत आणि त्यांचा हा प्रयत्न यशस्वी होऊन त्या थोड्याच— ( म्हणजे इतक्या वेळांत कीं त्यांची खिन्नता सरोजच्या इतक्या दिवसांत लक्षांत नव्हती ) वेळांत पूर्ववत् आनंदी दिसूं लागत.

नाना निघून गेल्यापासून, सरोज हेंच, काकूंच्या जीवनांत रमणीयता उत्पन्न करण्यास साधन होतें. परंतु तिच्या होत चाललेल्या परिस्थितीकडे पाहिलें म्हणजे काकूंच्या पोटांत कालवाकालव सुरू होई. त्यांना वाटे ‘ एक पोर आणि तिच्या लग्नाचे असले धिंडवडे होतात. १०–५ मुली असत्या तर काय झालें असतें? ’ असे विचार आले कीं त्याना वाटे जाऊं दे ती कुठें तरी–तिथें तरी चार दिवस तिला सुख लागेल. आज अनायासेंच अमिराबादेस जाण्याचा योग आला होता. परंतु काका रागांत असल्यामुळें तिनें जाणें श्रेयस्कर नव्हतें. असा दुहेरी पेंच पडला होता. शिवाय काकांना विचारायला जावें कुणी, हा प्रश्नच होता. म्हणून त्या म्हणाल्या ‘ सरू ! सरोजनें हवापालट करावा असें मला सुद्धां वाटतें; पण ते रागावलेत ना ! ’

'काकू, म्हणूनच माझी घाई आहे' सरल म्हणाली. 'हा कपिलाषष्ठीचा योग उगीच वाया कां दवडायचा?'

'पण मी नाहीं बाई आतां वरतीं जात.'

'काकू, माझं तुम्ही ऐका–मी उद्यां जाणार आहे. तुम्ही एकदां वरती जाऊन काकांच्या कानावर घालावयाचें कार्य करा.'

सरोजला त्या परिस्थितींत सुद्धां सरलेच्या 'कार्य' या शब्दाचें हसूं आलें. त्या लहानपणीं जेव्हां इंग्रजी तिसरींत एका वर्गांत होत्या, त्यावेळचा तो 'कार्य' शब्द होता. एका मास्तरांच्या तोंडीं तो नेहमीं यायचा. त्याच शब्दाचा पुनरुच्चार तिच्या कानाला फारच गोड लागला; पण 'गेले ते दिवस' म्हणून तिनें एक उष्ण निःश्वास सोडला.

काकू हो ना करतां करतां कशा तरी एकदाच्या वरतीं गेल्या. भीत भीतच त्यांनीं काकांना हा वृत्तांत सांगितला. काकांचा राग अजून शांत झाला नव्हताच. त्यांनीं परवानगी दिली. 'वाटेल तिथें जाऊन वाटेल तशी नाचूंदे, पण माझ्यासमोर तिचे असले खेळ नकोत.'

काकांची ही भाषा ऐकून काकू तिथल्या तिथें थिजल्या. घरांतल्या या जुलमी कारभाराचा त्यांना मनांतून भयंकर संताप आला. त्या ती भाषा ऐकून खालीं कशा आल्या हें त्यांचें त्यानांच समजलें नाहीं. मग त्यांनीं काकांचा निरोप या मुलींना कसा सांगावयाचा? त्या खालीं आल्या आणि स्वयंपाकघरांत तशाच निघून गेल्या.

---

# १३

काकांचें वर झालेलें भाषण दोघींच्या पूर्ण कानांवर आलें होतें. काकू वरून खालीं आल्या होत्या, हेंही दोघींनीं पाहिलें होतें. पण काकूंच्या तोंडून काकांचे कठोर शब्द ऐकण्याची त्यांचीहि इच्छा नव्हती. दोघीही अगदीं स्तब्ध बसल्या होत्या.

थोड्या वेळानें सरोजनें समोरील शेल्फवरचें एक पुस्तक काढलें· आणि त्या पुस्तकाचीं पानें ती उगीचच चाळूं लागली. मनांतले विचारांचे अवडंबर अशानें तरी स्थिर होईल असें तिला वाटत होतें—पण व्यर्थच होतें तें. सरलेनेंसुद्धां जवळ पडलेला एक मासिकाचा अंक उचलला आणि सरोजच्याच पद्धतीनें तिनें पानांची चाळवाचाळव सुरूं केली. अखेर एका पानावर स्थिर होऊन सरोज अस्फुट वाचूं लागली.—

‘ कितीतरी कमळें प्रफुल्ल झालीं होतीं—आणि अगदीं एका बाजूला आडरानांत—जिथें वर्षांतून एखादे दिवशींच बालवीरांचा तांडा वनभोजनासाठीं—किंवा इतर खेळ खेळण्यासाठीं यावयाचा, अशा ठिकाणीं तीं कमळें अगदीं उमलून सौंदर्याविषयीं जणूं त्यांच्यात स्पर्धा लागली होती, असें वाटे. तिथें आज काळ्याकभिन्न भ्रमरांचा तांडा गुंजारव करीत त्यांच्या भोंवती घुटमळत होता. ज्या कमळावर ज्या भुंग्याला बसावेंसें वाटेल त्याच कमळावर तो बसावयाचा—माझें असेंच नाहीं का ? माझ्या मनात चटकन् हा विचार आला. ’

तें पान संपलें होतें. पान उलटण्यापूर्वी सरोजनें सरलेकडे पाहिलें.

‘ माझें याच्या अगदीं उलट आहे ’ ती म्हणाली.

‘ तें कसें काय ? ’ सरलेनें विचारिलें. तिनें तिचें वाचन अस्फुट कां होईना पण ऐकलें होतें.

‘ माझ्या बाबतींत लोहचुंबकाची आकर्षण शक्ति लोखंडाकडे गेली आहे. ’ सरोज हें बोलली खरी, पण आपण काय बोलतों हें तिचें तिलाच

उमगेना. म्हणून सरलेच्या उत्तराची वाट न पाहतां तिनें पान उलटलें.

"या वेड्यांनीं कधीं विचार केला आहे कां ? वेडेच ते–विचार तरी कसला करणार ? ज्या कमळावर आपण बसतों तीं कमळें आपल्यावर खूप असतात कां ? विचार करतां करतां मला किंचित् वाईट वाटलें. आमच्या पथकांतला तो एक साधारण सुंदर आणि श्रीमंत आईबापांचा मुलगा होता. मास्तरांना तो फार आवडे. एकदां मास्तरांचा चार वर्षांचा सुधीर रडूं लागला होता. त्यावेळीं यानें त्याची खाऊ वगैरे देऊन समजूत घातली होती. त्या वेळेपासून आमचे मास्तर त्याच्यावर खूप आहेत. मी मास्तरांच्या पुढें पुढें करीत नाहीं. एवढेंच; पण माझी पथकांतील वागणूक इतर किंवा त्या माझ्या मित्रापेक्षां जास्ती चांगली असून ....' माझी विचारमालिका अशीच तुटली. सडक काळया भोर केसांच्या शेपट्यांवर दोनच गुलछबूचीं फुलें खोविलीं होतीं. ती पाठमोरी आकृति त्या फुलामुळें अतिशय सुंदर दिसत होती. आणि ती फुलेंसुद्धां–किती गोंडस आणि गोड दिसत होतीं ! भुंग्यांचा रानटी सहवास सोडून त्यांच्या मंजु कूजनाला भूलून न जातां एका सुंदर युवतीचा सुंदर कचकलाप आपण जास्ती भूषित करीत आहोंत याबद्दल तीं फुलें स्वत:लाच धन्य मानीत असलीं पाहिजेत."

फारच मन लावून सरोजनें हें पुस्तक वाचण्याचें ठरविलें होतें. क्षणापूर्वीचें वावटळ शमलें होतें. सरलेला सरोजचें पुस्तकांत मन रमलेलें पाहून अत्यंत आनंद वाटत होता. तिनें आपल्या हातांत जें मासिक घेतलें होतें. त्यांचींच पानेंच ती चाळत बसली होती. पुस्तकाचा शेवट काय आहे. म्हणून एकदम २०–३० पानें तिनें उलटलीं, आणि ती वाचूं लागली.

'लहानपणापासून मला फिरण्याची फार हौस. मी रोज फिरायला जात असें. आज असाच फिरायला गेलों होतों. साधी कोरांटीचीं झाडें त्या बाजूला पुष्कळच उगवलेलीं होतीं. आज कित्येक दिवसांतून उषा माझ्याबरोबर फिरायला आली होती. पिवळसर गुलाबी रंगाचीं नाजूक होतीं तीं फुलं ! तिचें मन आवरेना. तोडावी आणि त्यांना गुंफून आपल्या आंबाड्यावर बांधावीं असें तिला वाटलें.

' फुलं तोडूं लागतां मला जरा ? ' उषा म्हणाली.

मी नकारार्थी मान हालविली.

' कां ? ' तिनें विचारिलें.

' तूंच फुलं तोडावीस असें मला वाटतें. ' मी म्हणालों.

' अस्सं ! अस्सं ! ' म्हणून तिनें फुलें तोडण्यास सुरवात केली. १०–१५ फुलें कशीं बशीं तोडलीं असतील तिनें, तोंच तिला एक कोरांटीचा बारीक काटा बोचला. तिचें तोंड गोरेमोरें झालें होतें. माझ्याकडे ती लटक्या—आतां सांगतां येत नाहीं मला—तिचा राग कसला होता तें—रागानें पाहूं लागली. आज माझ्याबरोबर ती फिरायला आली होती म्हणून मीहि थोडी सहानुभूति दाखविली.

' उषा, काटा लागला ? ' मी जवळ जाऊन विचारिलें.

' होय हं सूदन. '

' पाहूं कुठें आहे तो. '

' नको, कांहीं जरूर नाहीं. '

हाताच्या बोटाला लागलेला काटा तिनें स्वतःच उपसून फेंकून दिला. आणि त्यापूर्वीच अर्धक्षण हातांत असलेलीं तीं नाजुक फुलें तिनें फेंकून दिलीं होतीं. त्या फुलाकडे माझी सहज नजर गेली. तीं जरा सुकलेलींच मला दिसलीं. शेजारच्या कोरांटीला नुकताच फुलांचा नवीन भर आला होता.

तिच्या आणि माझ्या आजपर्यंतच्या सहवासाचें दृश्य या आत्तांच्या प्रसंगांत मला दिसत होतें. तिची मधुर भाषा मी माझ्या हृदयाशीं किती दिवस तरी जशीच्या तशी धरून ठेवली होती. पण तिच्या विशिष्ट वर्तणुकीचे काटे मला वारंवार टोचूं लागले. मला ती किती आवडे; परंतु काट्यांचा कठोरपणा मला सहन नाहीं झाला. म्हणून हें काट्याचें झाड माझ्या दृष्टीआड करण्याचा मी प्रयत्न केला. आणि म्हणून मला तिच्या गोड भाषणाचाही त्याग करावा लागला. त्याग करतेवेळीं त्यांना पहिलें तेजही नव्हतें आणि नवीन सुमनांचा बहरही तिच्या हृदयांत मला दिसेना. पडद्यावरच्या चित्राप्रमाणें तत्तुल्य प्रसंग मला आठवत होते.

तिनें फुलें फेकून दिलीं तेव्हां मी तिला विचारिलें, 'उषा, रागावलीस हो तूं त्या फुलावर ?'

येथपर्यंत वाचन झाल्यावर ती थांबली. खुणेसाठीं बोट ठेवून तिनें पुस्तक मिटलें, आणि ती कसला तरी विचार करूं लागली. विचार करतां करतांच तिनें पुस्तकाचें नांव वाचलें. 'माझी डायरी' हें त्या पुस्तकाचें नांव.

'किती छान आहे हें पुस्तक सरल!' ती म्हणाली 'माझी डायरी लिहिली तर मला वाटते ती अशीच होईल.'

सरल कांहींच बोलली नाहीं.

'प्रेमाचें मोजमाप व्यवहार आहे. हें या लेखकाचें म्हणणें आहे. तुला कितपत पटतें?' तिनें विचारलें.

'तुम्ही शिकलेल्या मुली कशाचा कधीं विचार सुरूं कराल हें केल्याच्या धरणीकंपाइतकेंच अनिश्चित आहे.' ती हंसली—'बरं सरोज, रागाऊं नकोस हो! सांग मला तो तुझा लेखक काय म्हणतो तें,' सरल पुन्हां म्हणाली.

'ही डायरी म्हणजे माझ्याच भूतभविष्याचं रामायण आहेसं मला वाटतं!'

'अगं हो सरोज, बरी आठवण झाली. आज मंदेच्या मासिकाचा वाढदिवस आहे आणि आपल्याला जायचं आहे. तूं आपली तयारी कर. मी येतेंच आतां घरून जाऊन.'

'सरु, मी नाहीं आलें तर—'

'तुला यावें लागेल. मला माहिती आहे घरीं कां बसणार आहेस तूं तें. गोड स्मृतीचें दुःख आठवून...'

'नाहीं सरल, मी आज हें पुस्तक वाचणार आहे. इतक्या दिवस माझ्याजवळ असून आज मी तें वाचायला घेतें आहें हो—'

'तें कांहीं नाहीं. आलंच पाहिजे तुला आज माझ्याबरोबर.'

'बरं पाहीन—तूं ये घरून जाऊन.'

सरल निघून गेली. सरोजच्या डोळ्यासमोर वाचलेला सगळा मजकूर जशाचा तसा उभा राहिला. ' उषा सूदनला आवडली नाहीं— त्याच्याशीं तिनें प्रतारणा केली म्हणून. म्हणून सूदन तिच्याशीं जितक्यास तितकें वागूं लागला. ' ती मनांत म्हणाली, ' भ्रमराचा त्याग करून कमळ इतरत्र अधिष्ठित होण्याचा प्रयत्न करील तर त्याला छचोर गुलछबूच्या फुलांचा कचकलाप कधींच मिळावयाचा नाहीं. त्याला श्रीगणपतीच्या शीर्षस्थानींच स्वतःला भूषित करून घेणें भाग पडेल आणि तेंच त्याला भूषणावह आहे. पण तेंच—कोरांटीच्या फुलासारखे—त्याला नको असेल तर—तर त्या फुलाप्रमाणेंच त्यांची स्थिति होईल. ' असा विचार ती आपल्या मनाशींच करीत होती. पुन्हां पुढचें वाचण्याकरितां तिनें पुस्तक उघडलें. इतक्यांत कोणी तरी दारांत आल्याचा भास झाला व लगेच मागोमाग दारावर दोन टिचक्या ऐकूं आल्या म्हणून सरोजनें उठून दार उघडलें.

' कोण मोहन ? ' ती म्हणाली

' सरला नाहीं इथें ? ' तो म्हणाला.

' नाहीं ती आतांच गेली ' थोरल्या दरवाजाकडे असलेल्या त्याच्या तोंडाकडे पहात सरोज म्हणाली. इतक्यांत पुस्तकांतून कसला तरी कागद पडला. तो घेण्याकरतां ती खालीं वाकली. दारांतून बाहेर पडलेला कागद घेतांना वाऱ्यानें तिचा पदर उडाला. आणि त्यानें मोहनचा गाल किंचितसा चाटला. पदर उडाल्यामुळें पाठीचा पृष्ठभाग गुलाबी झंपरमुळें फारच खुलून दिसत होता.

सरोजनें तो कागद उघडून पाहिला.

' एक्स्क्यूज फार दी ट्रबल्स. ' तो म्हणाला.

' छे ! त्रास कशाचा ? ' ती म्हणाली. ' बरं तुमचं कांहीं हरवलं आहे कां ?

' कशापैकीं आहे ? '

' तें नाहीं कोणी सांगत. '

' माझ्या पुष्कळ वस्तु हरवतात आणि हरवल्या पण आहेत—मग

त्या सगळया वस्तूंचीं नांवें घेऊ कां कोणच्या एका गोष्टीचं नांव घेतलं तर चालेल ? '

' चालेल. पण तें एक जें नांव घेणार आहांत तें तुमच्या बायकोचं घ्या. '

' बायकोच्या नांवाला इतका मी भिणार आहे ? ती मिळाली म्हणजे सांगेन तुम्हांला तिचं नांव, '

' हो ! हो ! ' ती म्हणाली.

' आतां समजा, पहिल्या खेपेलाच तो जिन्नस मी ओळखला तर— तर तुम्ही नांव घ्याल कां ? ' जरा वेळ थांबून ' कां ? गप्प बसलांत ? '

जन्माच्या मित्राचें नाव लग्नानंतर ठरतें, किंवा अगोदर ठरलें असलें तरी तें जगांत जाहीर करण्यासाठीं मन कचरतेंच. त्यांतून सरोजच्या बाबतींत बोलावयाचें म्हणजे—तिनें जन्माच्या सोबती मनाशीं ठरविला होता तरी त्या सोबत्याला तिची सोबत कितपत रुचते याविषयीं तिला शंकाच होती. आणि आतां स्वतःवर नांव घ्यावयाची जेव्हां पाळी आली त्यावेळीं तर तिला चमत्कारिकच झालें. मोहनशीं कांहीं तरी बोलावयास पाहिजे होतें म्हणून ती म्हणाली, ' मग जरूर नाहीं असें दिसतें ? नको असेल तर तसें सांगा.'

' माझी एक कविता हरवली आहे. ती तुमच्याजवळ आहे. ओळखलं ना—घेतां नांव ? '

' नांव घेण्याचें हें १८५७ सालांतलें जुनें खूळ काय माजवलं आहे उगीच ' आणि मानेला तिनें एक विशिष्ट प्रकारचा झटका दिला अन् ती आंत गेली.

' मग ती कविता देणार आहांत काय ? '

' वाचतें एकदां आणि देतें.'

' जरा ऐकूं येईल अशा आवाजांत सूर धरलांत तर— '

' नाहीं हं मी कांहीं गायिका नाहीं किंवा स्वतःच्या कवितेवर दिवे ओवाळून घेणारी कवियित्रीही नाहीं—तें जाऊं दे—'

'—बरं पण बाहेर उभें राहून बोलायची सक्त शिक्षा कोणी केली आहे तुम्हांला—?'

'हिंदु स्त्रियांची निष्कारण विनयशीलता—ती असल्या शिक्षा सुनावते.'

'अस्सं! अस्सं!' ती म्हणाली, 'बरं मग—'

'जाऊं म्हणतां! जातों मी; पण येणार आहांत काय मंदेच्या घरीं? आज तिच्या मासिकाचा वाढदिवस आहे. तुम्हांला बोलावणें आहेच.'

'मी येणार नाहीं.'

'कां? प्रकृति ठीक नाहीं?'

'हं.'

'काय होतंय—डोकं बिकं दुखत असेल. ताप बीप नाहीं ना आला?'

'डॉक्टर—डॉक्टरकीच्या प्रॅक्टीसचा प्रयोग माझ्यावरच प्रथम करणार आहांत वाटतं?'

'नाहीं तसं नव्हे. आपलं विचारलं. सरलेबरोबर औषध पाठवून देतों. आणि यावसं वाटलं तर या मंदेच्या मासिकाच्या वाढदिवसाच्या समारंभाला अं!'

मोहन निघून गेला. आज मंदेच्या मासिकाचा वाढदिवस होता. वाढदिवस आणि पुण्यतिथि या दोन गोष्टी कालमान मोजण्याचें साधन आहे. मनुष्य जन्माला आल्यानंतर तो वाढदिवसास पात्र होतो. मेल्यानंतर त्याच्या पुण्यतिथी सुरू होतात. पण प्रसंगाचें वाढदिवस-कां पुण्यतिथी असते कोणास ठाऊक?

नाना घरांतून बाहेर पडला तो आजचा दिवस होता. त्या दिवसाची स्मृति म्हणून वाढदिवस मानावयाचा कां पुण्यतिथि समजावयाची याचा उलगडा सरोजला होईनाच.

पण तिला मंदेच्या घरीं जावेंसें वाटलें इतकें खरें. कारण मोहन गेल्यावर तिनें बाहेर जाण्याच्या तयारीला सुरवात केली. अस्वस्थ मनानेंच चाललें होतें सगळें.

# १४

बंगल्याच्या पोर्चमध्यें घोड्याची गाडी शिरली. मोहन, सरल-सरोज, अशीं तिघे बाहेर आलीं. आणि मुख्य दरवाजाच्या आंत शिरल्या नंतर डाव्या हाताला असलेल्या जिन्यावरून वर गेलीं.

त्या हॉलच्या दरवाज्यांत पारशी पद्धतीच्या गोल पातळांत असलेली मंदा उभी होती. त्या पातळाचा अस्मानी रंग आणि मधून मधून त्याची चकाकणारी किनार फारच गोड दिसत होती. कानापासून लोंबत असलेले चपटे डूल, अर्ध्या डोक्यावर असलेला पदर, त्यांतून बाहेर डोकावणारे केसांचे फुगे फारच आकर्षणीय दिसत होते.

‘ यावं मंडळी ’ या मंडळींना पाहिल्यावर हात जोडून स्वागतार्थ मंदा म्हणाली. ‘ तुमचीच वाट पहात होतों आम्ही इतका वेळ. ’

‘ उशीर झाला फार ’ मोहन हंसत म्हणाला.

‘ तुमच्या जातीला झालेला उशीर माफ असतो. ’

‘ माझ्या एका जातीला उशीर माफ आहे. पण मी आतां दुसरा धर्म स्वीकारला आहे. त्या धर्मांत विलंबाला मुळींच माफी नाहीं.’

‘ म्हणून सोडून द्या एक कोणचं तरी—बरं सरोज, आलांत बरं झालं ’ तिनें विषय बदलला आणि मुख्य कार्याला सुरवात झाली.

सरोजचें लक्ष इतर कार्यक्रमांकडे नव्हतेंच. मोहनच्या सर्व हालचालीवर तिचें बारीक लक्ष होतें. मंदेची मिळून मिसळून वागण्याची कला हातोटीची होती. एका मासिकाची संपादिका या नात्यानें तिनें सर्वांवर बरेंच वजन मारलें होतें. हें आजच्या गॅदरिंगवरून सहज लक्षांत येत होतें. तिची भाषा अतिशय गोड होती. आणि मुखावरचे भाव कोणाच्याहि लक्षांत न येतां बदलण्याची शैली तिला चांगली साधली होती. हें सरोजला पूर्ण कळून चुकलें होतें.

अध्यक्षांनीं संपादिकेचे आभार मानून बक्षिसें जाहीर केलीं. पहिल्या प्रतीचें बक्षीस मोहनला होतें. मोहनचें नांव ऐकतांच सरोजनें मोहनकडे पाहिलें. मोहनचा हंसरा चेहरा तिला फारच आवडला. मोहनचें लक्ष तिच्याकडे गेलें. ती आपल्याकडे अशीच पुष्कळ वेळ पहात असावी असें त्याला वाटले. त्यांनीं तिच्याकडे पाहिल्यावर तिनें सरलेकडे पाहिलें. सरलेचें ओठ अभिमानानें विलग झाले होते.

'या मासिकाला अनेक वेळां मोठ्या संकटांतून आपला मार्ग आक्रमावा लागला आहे, परंतु तशा प्रसंगांतून देखील वाट काढून आजपर्यंत या मासिकानें मोठ्या शिताफीनें आपला बचाव करून घेतला, यांचें श्रेय या मासिकाच्या संपादिका सौ. मंदाताई यांनाच द्यायला पाहिजे. अनेक तऱ्हेचे लेखक मिळवून आपल्या मासिकांत सर्व विषयांची मुद्देसूद चर्चा व्हावी अशी त्यांची फार इच्छा. त्याप्रमाणें त्यांनीं पुष्कळ खटपटीनें चांगले लेखक मिळवून मासिकाला अत्यंत उच्चस्थानीं नेऊन ठेविलें. त्याबरोबरच ललित वाङ्मयाच्या प्रवेशद्वारांत आणून सोडण्याचें काम त्यांनींच केलें आहे. त्यांच्या कवितेविषयीं सध्यां चर्चा करणें नकोच आहे. परंतु उद्या त्यांचे डॉक्टरकीचें प्रॅक्टिस सुरूं झाल्यावर—मला वाटतें—या मासिकाला होणारी त्यांची मदत खुंटेल. तरी सुद्धा वाङ्मयाकडे त्यांनीं मुळींच दुर्लक्ष करूं नये अशी मी त्यांना या प्रसंगीं सर्वांच्या वतीनें जाहीर विनंति करीत आहे. आतां कवींच्या मुखांतून त्यांच्या स्वतःच्या कविता ऐकण्याचें भाग्य आज प्रथमच निदान मला तरी लाभणार आहे. कारण आजच्या कार्यक्रमांत अध्यक्षांच्या भाषणानंतरचा कार्यक्रम म्हणजे कुमार मोहन यांचें कवितागायन आहे.'

इतर जमलेल्या साहित्यिकांनीं टाळयांचा वर्षाव केला, पण मोहनला हा अनपेक्षित प्रकार वाटला. इतक्यांत मंदा जवळ आली. 'मोहन!' तिरपा कटाक्ष फेकून ती हंसली.

'मंदा! मला अगोदर कां नाहीं सुचवलंस?'

'त्यांत काय झालं? आत्तांच्या आतां तुम्ही सहज एखादी कविता कंपोज कराल कीं!'

'वा वा ! चांगलं.' याअर्थी त्यानें मान हलविली.

'........शेवटीं अध्यक्षपदावर माझी स्थापना झाली याबद्दल नित्याच्या व्यवहाराप्रमाणें मी आपले सर्वांचे आभार मानावयास पाहिजे आहेत.'

आतां अध्यक्षांचें भाषण संपणार आणि आम्हांस कविता म्हणावयास लागणार म्हणून कविता कोणची म्हणावयाची या विचारांत तो होता. इतक्यांत टाळ्यांचा कडकडाट झालेला त्याच्या कानावर आला. त्यानें अध्यक्षांच्याकडे पाहिलें तों ते आपल्या खुर्चीवर रेलून बसलेले त्याला दिसले. तो उठला कसा तरी. इतक्यांत सरोजनें त्याला एक कागद दिला. तो व्यासपीठाकडे जाऊं लागला. 'अगोदर कार्यक्रम लोकांना कळेल असें तरी कांहीं करावयाचें होतें, ही संपादिका आहे कां कोण आहे ?' असें तो जातां जातां पुटपुटलाच. कविवर्यांनीं काव्यगायनाला सुरवात केली.

भय भीति तुज ना कशी विमले ?। वाकुनि बघसी आडाकडे ॥
तारा चमचमती गगनीं। भूवरी तम तरी कां म्हणुनी।
प्रभातकालीं दीन मणी। अरिसम भासे माध्यान्हीं।
जग चाले हें असें गडे। चल तूं आतां घराकडे ॥
शेजारिल त्या तळयामधें। कमल कमलिनी मनामधें।
दोषारोपा तुज करिती। 'वेडी' म्हणुनि तुज हंसती।
दृष्टि फिरव ना तूं तिकडे। स्पर्धा शर ना सह निधडे ॥
वळवी नयना दरीकडे। जिथें वासरें तिथें गुरें।
हं ! हांस पाहूं गोड गडे। घरीं चल ना प्रभ्याकडे ॥

छे ! कोण ? तुम्ही इथें कसें ?। प्रभा एकटा कसा वसे।
झप झप जाऊं चला गडे। घरीं चला ना प्रभ्याकडे।

जग चाले हें असें गडे। स्वीकृत मार्गा क्रमी बरें।

सुमधुर कंठांतून असलें भावगीत—त्यांतून कवीच्या मुखांतून

बाहेर पडले. निश्चल स्तब्धता जणूं त्या भावगीतांतले भाव आकंठपान करीत होती. प्रेक्षकांच्या माना डोलूं लागल्या होत्या. आयुष्यांत ऊन आणि सावली असतेच, तरीदेखील सावली येईल त्यावेळचा मार्ग निराळा आणि ऊन पडल्यावर मार्ग निराळा अशा तऱ्हेनें मार्गाची अदलाबदल मानव करीत राहतील तर शेवटचें ध्येय त्याला कधींच गांठतां यायचें नाहीं. हा कवितेंतला भाव होता. कवितागायन संपलें होतें तरी बसलेल्या मंडळींत मुळींच हालचाल दिसेना. पण नंतर मासिकाच्या संपादिका सौ. मंदाताई व्यासपीठावर आल्या आणि त्यांनीं बोलण्यास सुरवात केली. त्यावेळीं लोक खडबडून जागे झाल्यासारखें करून जागच्या जागेवर जीवंतपणा दिसेल अशा बेतानें बसले.

'अध्यक्ष आणि बंधुभगिनींनो— !' सर्वांच्याकडे आळीपाळीनें पहात मंदेचें भाषण चाललें होतें. कोणी आपल्या पाठीवर मिठाची गोण आणून ठेविली काय— असें तिला मुळींच वाटत नव्हतें. कांहीं अंशीं पुरुषी पवित्र्यांत ती उभी राहिली होती. अर्धसंगम केलेले दोन्ही हात तिनें आपल्या छातीवर ठेविले होते. डावा पाय पुढें व उजवा तिरप्या रेषेंत थोडासा मागें असा तिनें टेवला होता.

'खरोखर आजच्या आनंदाच्या प्रसंगीं आपण सर्व मंडळी हजर राहून मला फारच आनंदित केलेंत. जगांत असें कांहीं दिवस परमेश्वरानें प्रत्येक मनुष्याला दिलेले असतात कीं त्या दिवशीं त्यांच्या आनंदाचा कळस होतो. आजच पहाना— साहित्याचार्य बंडोपंत सुखलोलुप, कुमार मोहन— फर्डे कवि आणि गायक आणि आपल्यासारखे पसंत लेखक—'

'आणि आपल्यासारख्या गोड अन् सुबुद्ध संपादिका' कोणी—तरी बोलले. ती एका मजल्याचें हंसली.

'हो ऽ माझ्यासारखी गोड अन् सुबुद्ध संपादिका हजर असल्यावर आनंद आणि संतोष ही दुक्कल कधींही गैरहजर रहाणार नाहीं. बरं जाऊं दे !'

'आतां अध्यक्षांनीं आपल्या मासिकाविषयीं चार शब्द सांगितले

आहेतच. मला त्याविषयीं कांहीं जास्ती सांगावयाचें नाहीं. वास्तविक आभारप्रदर्शनाचेंच—नाहीं हं चुकलें मी—खरोखर आभार मानण्याचेंच काम माझ्याकडे आहे आणि त्याच कामाला मी आतां सुरवात करतें. तुमचे आभार आम्ही कां मानावयाचे याचीं कारणें द्यावीं लागतात अशी साधारण वक्तेवर्गांत प्रथा पडून गेली आहे. त्यालाच मला अनुसरणें भाग आहे. अगोदर हें सांगितलें पाहिजे—मला बोलण्याची पाळी फार क्वचित् येते, त्यामुळें पुष्कळ चुका आणि बोलतां बोलतां वाटेल तिकडे मी भटकेन तिकडे अध्यक्षांसह श्रोतृवृंदांनीं कानाडोळा—म्हणजे तिरपा कटाक्ष नव्हे—करावा. त्याबद्दल मी शेवटीं आभार मानणार आहेंच.—'

'तिरपा कटाक्ष' हे शब्द मोहनला आणि सरोजला जास्ती लागल्यासारखे दिसले. सरोजच्याकडे आपण मधून मधून जरासे वाकडी मान करून पहात आहों, हें मंदेनें पाहिलें असावें असें त्याला वाटलें म्हणून त्यानें स्वतःला सावरण्याकरतां मंदेचें भाषण अगदीं लक्षपूर्वक ऐकत आहोंत असा बहाणा करण्यास सुरवात केली. तसेंच सरोजचें झालें. तिला तर अतिशयच चमत्कारिक झालें. नुसतें मंदेनें पाहिलें तर फार वाईट नाहीं पण तेथें जमलेल्या इतर लोकांनीं पाहिलें नसलें म्हणजे बरें. आणि आतां चुकूनसुद्धां आपली दृष्टि वळवायची नाहीं असाच जणूं तिनें मनाशीं निश्चय करून ती स्वस्थ बसली.

मंदा खरोखर अगदीं मोकळ्या मनाची स्त्री होती. तिच्या बाह्य पोषाखांत सुद्धां ताठरपणापेक्षा घळघळीतपणा जास्ती होता. निसर्गाची सजावट अशीच मोकळी होती. केसांना तिनें कधींच चापून चोपून बसविण्याचा प्रयत्न केला नव्हता—एक दोन बाकदार बटा इकडे तिकडे कुठेंतरी मोकळ्या असावयाच्या. त्याचप्रमाणें इतर सर्व गोष्टींत हातांतल्या बांगड्या—पायांतलीं पादत्राणें—नाहीं म्हणावयाला कुंकवाच्या बाबतींत तिचा मोकळेपणा नव्हता. पण तो कोणाच्या लक्षांत येत नव्हता. मोकळं मुखमंडल त्या टिकलीला संभाळून नेत असे.

भाषणांत हाच मोकळेपणा. अध्यक्षांच्या सिगारेट ओढण्यावर

तिनें विनोदी टीका केली आणि सर्वांचे आभार मानून शेवटच्या अल्पाहाराच्या कार्यक्रमाला दुसऱ्या हॉलमध्यें चलण्यास तिनें विनंति केली.

' बरं कां गं सरल, आतां एका माणसाची फार फजिती होणार होती. काय पण गोंधळलं होतं एक माणूस, ' सरोज म्हणाली.

' त्या माणसाचं नांव काय म्हणून नाहीं विचारलंस सरले, ' मोहन म्हणाला.

' पण गोंधळी कोण आहेत हें मला माहीत असून उगीच वेड घेऊन पेडगांवला कशाला जायचं ? पण सरोज ! तुझ्या लग्नाचा गोंधळ घालायला आतां दुसऱ्या गोंधळ्यांची जरूर नाहीं. नाहीं कां? ' सरल म्हणाली.

' कारण घरांतलाच गोंधळी मिळाल्यावर मग काय जरूर आहे नाहीं तरी ! ' सरोजनें किंचित वाकडें पाहिलें.

' नुसता घरांतलाच नाहीं सरले. लग्नांतली खाशी मंडळीच गोंधळी आहेत. ' मोहननें मटार उसळीचा चमचा जिभेवर ओतला.

' माझी एक कविता यांच्याजवळ होती. वाचते म्हणाल्या. वाचा म्हटलं जरा चढत्या सुरांत. इतक्या घाबरल्या अन् गोंधळल्या ह्या ' तो म्हणाला. सरूनें नुकतीच कॉफीची बशी तोंडाला लावली, होती. उजव्या हातांत हापुस अंब्याची फोड असल्यामुळें डाव्या हातानेंच सरोजनें सरलेला कॉफी घेण्याचें थांबविलें.

' मंदाताईनें यांना कविता म्हणायला सांगितली. आतां काय म्हणायचं ? म्हणून इतके गोंधळले होते हे–अगदीं पहाण्यालायक तोंड झालं होतं ह्यांचं—' सरोज म्हणाली.

' अरे वा ! अगदीं खाशी मंडळीच आहेत गोंधळाला–' सरल उद्गारली.

सरोजला फारच ओशाळल्यासारखें झालें. भलत्याच थरावर प्रकरण गेलेलें आहे असें तिला वाटलें. आणि मनांतल्या मनांत किंचित् हंसलीही. एकंदर आजच्या तिच्या वर्तनाचें तिचें तिलाच हंसूं आलें.

मंदेनें यांना निराळी जागा दिली होती. त्यामुळें लोकांच्या नज-

रेंत आपण खास नाहीं अशी यांची पक्की खात्री होती. परंतु ..... लोकांच्यावर यांची खूप नजर होती.

' कविराज अगदीं सहकुटुंब आलेत ' एकजण म्हणाले.

' आं म्हणजे त्यांचं लग्न झालं केव्हां ? ' दुसरा म्हणाला.

' आणि काय बेटा बात मारीत होता हो-डॉक्टरकीचं प्रॅक्टीस सुरूं झाल्याशिवाय लग्न करणार नाहीं-अशी अगदी त्याची भीष्म-प्रतिज्ञा होती, असें म्हणतात—' तिसरे म्हणाले.

' अहो या उष्ण रक्ताच्या वाफा कांहीं वेळ एकदिलानें जातात, पण पुढें वाटेल त्या दिशेला वहातात.' एक वृद्ध म्हणाले.

'नाहीं आगगाडीच्या धुराची उपमा जास्ती शोभेल,' तिसरे अगदी हलक्या आवाजात म्हणाले. त्याना वृद्धाची उपमा खोडून काढण्याची अनावर इच्छा झाली होती. शेजारच्या त्यांच्या मित्राला त्याचें हें बोलणें ऐकूं गेलें.

' वेडा आहेस तूं यादव. अरे ! उपमेंत तरी जिवंतपणा असूंदे तुझ्या ! कारंज्याप्रमाणें म्हणाला असतास तर ?' तो म्हणाला.

त्या हॉलला एखाद्या हॉटेलाप्रमाणें स्वरूप आलें होतें. प्रत्येक मित्र कंपूला जवळजवळ एक टेबल पुरत होतें, आणि त्या टेबलावर मांड-लेले जिन्नस पुरेसे प्रत्येक टेबलावर ठेविले होते, आणि मधून मधून मंदा प्रत्येक टेबलाजवळ जाऊन लोकांचा समाचार घेत होती. लोकांचें वरील विषयावर चाललेलें हें भाषण ऐकून तिला हसूं येई. पण तिचा नेह-मीचा स्वभावधर्म तसा होता हें तिच्या मासिकाच्या लेखकांना माहीत होतें त्यामुळें तिच्या हसण्याबद्दल त्यांना शंका आली नाहीं. मंदेच्या लेखकवर्गांत वाङ्मयांत नवीन पदार्पण केलें होतें असे कांहीं होतेच. त्यांच्या निराळ्याच कल्पना चालल्या होत्या.

' अरे तिचा अगदीं गतवर्षी माझ्या शेजारीं नंबर होता.'

' अरे वा ! नाईस ! मग कांहीं इम्प्रे-...' दुसरा.

' छे ! बाबा ! पण आय टेल यू, माझ्या हातांत घड्याळ होतं. '

' मग तिनें सांगितलं काय तुला ?' तिसरा.

' नाहीं रे ! हिअर मी. किती वाजले म्हणून तिनें मला विचारलें, बर कां ! बट माय क्लॉक वाज ड्रिंकिंग टी त्या वेळेला. मी इतका ओशाळलों म्हणतोस. ' सॉरी ! एक्स्क्यूज ! ' मी म्हटलें कसं तरी ' कांहीं हरकत नाहीं ' ती म्हणाली. बाकी मग कंडक्टरनीं सांगितलं तिला अगदीं जवळ जाऊन, '

' यट शी सीम्स मोस्ट पोलाइट ॲन्ड सोशल लेडी अं ! ' चवथे म्हणाले.

त्यांतल्या एका कंपूला तर त्यांचीं नातीं ठरवायला कमिटीच नेमलें होतें जसें कांहीं.

' अहो ! तो शेपटा कवींच कुटुंब असावं ' एक जण.

' हें पहा लग्नानतंर बायकोला शेपटा सोडून समाजात वावरायला लावण्याइतकें नवमतवादी हे कवि नाहींत. मी त्यांना साधारण ओळखतों. ' दुसरे.

' शेपट्यावरून काय ठरणार माती ! तिच्या गळयांत पाहिलंत कां तुम्ही ? तिचं लग्नच झालं नाहीं मुळीं ' तिसरे म्हणाले. आपलें बोलणें मंडळींना पटलें असें त्या गृहस्थास वाटलें. म्हणून नव्या उत्साहानें त्यानें आपलें भाषण चालूं ठेवलें. ' ती त्याची बहीण असावी आणि त्या दुसऱ्या जरा गंभीर दिसत होत्या ना त्या मात्र त्याचं कुटुंब असणं संभवनीय आहे. ' आपलं म्हणणं अगदीं तंतोतंत बरोबर असल्याचा त्यांना दाट संशय आला, पण खात्री पटेना. कारण मोहनचें लग्न झालें असतें तर धवलपुरसारख्या गांवांत कर्णोपकर्णीं झाल्याशिवाय राहिलें नसतें. जरी सुधारक पद्धतीनें झालें असतें तरी वर्तमानपत्राचा एकादा कॉलम भरल्याशिवाय राहिला नसता. निदान मंदेच्या मासिकानें तरी ही गोष्ट मासिकाआड केली नसती. आपण कसलें हें कल्पनेच्या आधारावर विधान केलें याबद्दल त्या गृहस्थाला जरा अस्वस्थता भासली म्हणून तो गप्प बसला. इतक्यांत मंदा त्या टेबलाचा समाचार घेण्यासाठीं आली. त्यामुळें तो विषय तिथेंच कायमचा मिटला.

‘ मोहन, काय बरी व्यवस्था झाली ना तुमची. ’ मंदा म्हणाली.

‘ मला वाटलं होतं मंदाताई आज कांहीं इकडे येत नाहीं. तिच्या मैत्रिणींच्या समाचाराला. ’

‘ मोहन घरांतल्या माणसाचा काय समाचार घ्यावयाचा असतो. ’ ती म्हणाली. ‘ तुम्हीं इथें होता म्हणून मी जास्त लक्ष दिलें नाहीं. ’

‘ पण मंदाताई माझा समाचार तुम्हीं घेतला नसता तर चाललं असतं. हीं परकीं माणसं आपल्या घरीं आलीं असतांना तुम्ही पाहिजे होता इथें—आणि तुमच्याशिवाय मजा नाहीं येत. ’

‘ खरं आहे मोहन, पण मी येथें बसलें असतें तर इतर लोकांना काय वाटलं असतं ? मोहन, रागावलात तुम्ही ? सरला, सरोज मला क्षमा करा हं. मोहन, नाहीं रागावलों म्हणा एकदां म्हणजे मला बरें वाटेल. ’

‘ मंदा तुझ्यावर मी कधींतरी रागावेन कां ? पण आतां बसणार ना थोडा वेळ. ’

मंदा तेथेंच एका खुर्चीवर बसली. मोहनची नवी—जुनीच पण सरलेला नवी—मैत्रीण इतकी जीवाची कशी याबद्दल सरलेला आश्चर्य वाटलें. मोहन रागावला असता तर तिनें काय केलें असतें कोणास ठाऊक ? पण सरलेचा त्या वेळपासून सुशिक्षित मुलीविषयींचा ग्रह फार वाईट झाला. तिला वाटलें या घटकेला आपण येथून चालते व्हावें पण हें अंमलांत आणणें जरा अवघड आहे. हें तिच्या त्याचक्षणीं लक्षांत आलें.

सरोजला सुद्धां मोहनच्या आणि मंदेच्या दाट परिचयाविषयीं भलताच संशय आला. ‘ प्रेम हें आंधळें आहे तरी त्या आंधळ्या प्रेमाला व्यवहार जास्ती समजतो वगैरे अनंत विचार मंदेच्या आणि मोहनच्या वागणुकीवरून ती करूं लागली आणि मोहनच्या वर्तनाचा तिला थोडासा तिटकारा आला. सरलसारखे तिला तेथून एकदम हलावेसें वाटलें नाहीं. पुष्कळशा गोष्टी वाईट असतात; परंतु त्यांचा अभ्यासासाठीं तरी निदान त्याग करून भागत नाहीं.

‘ बरं मंदाताई आतां आम्हांला रजा द्या ना. सरोजला फार वेळ बसणं शक्य नाहीं.’ सरल म्हणाली.

‘ आता झालंच — जायचंच — पण आपण आणखी थोडा वेळ गप्पा मारूं ना ! तुम्ही सगळी मंडळी आलांत. तुम्हांला मुळींच सोडूं नये असं मला वाटतं.’ तिचे दोन्हीं दंड गदगदां हालवून फारच मोकळं हंसली मंदा त्यावेळीं. ‘ आम्ही दोघी जातों. अप्पा आणि तुम्ही बसा गप्पा मारीत — देतां रजा आम्हांला.’ सरल म्हणाली.

मंदा अगदीं गप्प बसली. सरलेच्या मनांत कसला विचार आला होता हें तिनें जाणलें होतें. पण बोलून काय दाखवायचें असें तिच्या मनांत आलें.

‘ मंदा उद्यां मी जाणार आहे अमिराबादेला—आम्ही सगळी इथें आलोंत तेवढीं—’ मोहन म्हणाला.

‘ अस्सं ! ’ मंदा किंचित् हंसून म्हणाली. सरलेचें शेवटचें वाक्य म्हणजे कांहींच नाहीं असें दाखविण्याचा हा प्रयत्न होता, पण तितका या खेपेला तिला साधला नाहीं.

‘ म्हणजे पुन्हां तुला भेटण्याची जरूर नाहीं आतां—’ आतां तर अगदीं कहर झाला असें त्या दोघींना वाटलें.

‘ आलांत तर बिघडेल वाटतं कांहीं ?’

इतक्यांत एक नोकर आला व म्हणाला— ‘ बाईसाहेब ! साहेब फोनवर लवकर बोलवीत आहेत आपल्याला.’

‘ आलें हं मी ’ म्हणून ती निघून गेली. मोहन, सरल, सरोज स्तब्ध होतीं. कोणीहि कोणाशीं बोलत नव्हतें. थोड्या वेळानें मंदा आली. पाण्यांनीं ओलसर झाल्यासारखे तिचे डोळे झाले होते.

‘ बाकीची मंडळी गेलीं वाटतं मंदा ’ मोहन म्हणाला.

‘ हो गेलीं आतांच.’

‘ मग आम्ही जाऊं ना ? ’

‘ जाऊं ना म्हणून काय विचारतोस ? रहाण्याकरतां आला आहेस कां ? तसं असलं तर जाऊं आम्ही आपल्या सरोज.’

'सरले!' निघालेल्या सरलेला हुकमी आवाजांत मोहनची हांक ऐकूं आली.· ती तिथल्या तिथेंच थांबली. 'मंदा!' त्याचें लक्ष तिच्या डबडबलेल्या नेत्रांकडे गेलें. 'मोहन, जा तुम्ही. एक क्षणभरदेखील नका थांबू माझ्याजवळ.'

तोहि निघाला. दारांतून बाहेर पडल्यावर रात्रींच्या राणीचा उन्मादक सुवास त्याला फारच आवडला. एक फांदी तोडून घ्यावयास तो तिकडे वळला. वरच्या हॉलच्या खोलींत तें झाड होतें. फांदी तोडीत असतांना त्याला हुंदके ऐकल्याचा भास झाला.

'किती वेळ होतो आहे अप्पा; चल लवकर' त्याच्या मागोमाग सरलेचे शब्द त्याला ऐकूं आले.

---

## १५

तीन वाजले होते. बाहेर तोंड काढावयाची सोय नव्हती. तप्त रश्मी किरणांसहवर्तमान सम्राटासारखा आकाशांतून हिंडत होता. वस्तुमात्रांचें तेज नाहींसें झाल्यासारखें दिसत होतें. तरी सुद्धां वृक्षांचे आणि झुडुपांचे शेंडे सारखे डोलतांना पहावयास मिळत. सम्राटाला सक्तीची खडी सलामी देण्याचें हें उदाहरण समाजसत्तावाद्यांच्या हृदयाला चट्टा खास देत असावें, मूठभर प्रजेच्या रक्षणाकरितां दोन मुठी सैन्य पाहून वेली आदीकरून प्रजाजन एकमेकांच्या कानांत कांहीं गुणगुणत असाव्यात. सम्राटाला तें सहन न होऊन निःशस्त्र प्रजेवर धुली–अस्त्राची योजना ते

वरीत त्यावेळीं त्या प्रजेची फारच दैना उडे. त्यांची पर्णें विगलित होत. कांहीं पानांच्या आरपार धुळीचे कण निघून जात. कांहीं धाड धाड भूमीवर पडत. मोठमोठे वृक्ष देखील हतबल होऊन असह्य स्थितींत जमिनीवर पडत. ती प्रजा पूर्ण शांतता धारण करणारी होती. आलेल्या प्रसंगाला तोंड देऊन स्वतःच्या बलाची कल्पना असतांना— शांततेनें वागावयाचें. अर्थात् त्याशिवाय मार्ग नव्हता.

प्रत्येक घराचीं तावदानें बंद होतीं. रस्त्यावर मनुष्य फार क्वचितच दिसत होतें. कुठें कुठें दारावर वाळ्याचे पडदे टांगलेले दिसत.

नानाला आज रविवारची सुटी होती. सकाळीं दादासाहेब त्याच्या खोलीवर आले होते. आणि त्याला सांगून गेले होतें कीं, आज पांच वाजतां स्टेशनवर जावयाचें आहे म्हणून. त्यामुळें नानाला त्या दिवशीं इतर कामें करण्यास पांचनंतर वेळ मिळणार नव्हता. म्हणून तो इतक्या उन्हाचाच बाहेर पडला. बाहेरची ही रखरखीत सृष्टि त्याच्या रुक्ष अन्तःकरणाला फारच रुक्ष भासत होती. 'आडदांडपणा अखेरीस पराजित होतो. आणि सौम्य प्रतिकार करणाऱ्याची तळी जागच्या जागीं स्थिर असते.' असें कांहींसे तो अर्धवट तोंडांतच पुटपुटला. भयंकर उन्हांतून बाहेर जाणें त्याच्या अगदीं जिवावर आलें होतें. आणि परत घरीं जावें असाहि विचार त्याच्या मनांत आला होता. म्हणून तो एक सेकंदच थांबला; पण पूर्वीपेक्षां जास्त वेगानें वाट चालूं लागला.

'भय्या, वर जाऊं का रे?' हातांतील छत्री जिन्याकडे दाखवीत नाना म्हणाला.

'आपका नाम क्या हाय साब?' भय्यानें विचारलें.

'नांवाची काय जरूर असते येथें?'

'ये क्यॅ हय मालुम हॅय ना? ये ऐसेवैसे आदमीओंके वास्ते नहि हय!'

'बरं-बरं-माझं नांव—नाना काळे.'

'अच्छा! मै आपकी खबर देनेकू जाता है.'

'अच्छा!' नाना म्हणाला. आपण यावेळीं 'अच्छा!' कसें

म्हणालों हें त्याचें त्यालाच उमजेना. मनांतून तो भीत होता. आज आपण काय करीत आहोंत ? ज्या गोष्टीची कल्पनादेखील आपल्या मनाला कधीं शिवली नाहीं ती गोष्ट काळा चष्मा लावून आपण करीत आहोंत ! जगाला आपलं अन्तरंग कसं कळणार ? जग म्हणेल, ' नाना, वेश्येकडे जातो. ' कोट्यवधि तोंडानें जग बोलणार ! हा विचार त्याला अगदीं असह्य झाला. इतक्यांत तो भय्याहि तेथें आला. त्यानें वर जाण्यास कांहीं हरकत नसल्याचें सांगितलें. पण बोलतां बोलतां तो म्हणाला, ' आप तो बहोत बडे आदमी दिखते है. दुनिया ऐसी है–विचार करनेकी बात है–दुनियेके सामने आपके जैसे लोक कैसे मुह दिखाय सकते ? '

' मग ? ' नाना जरा रागानेंच म्हणाला.

' ये बात आपको और मेरेकू और तिसरी बाईसाबकू ये तिनोमें रहना चाहिये. आप मुझे पाँच रुपिया दे दो. मै ये सब बेमालुम काम करता है. देखो. '

नानानें एक पांच रुपयांची नोट त्याच्या हातावर टाकली आणि तो जिन्याकडे वळला.

नाना जिना चढून वर जात होता म्हणजे कार्यापासून निवृत्त करणाऱ्या प्रत्येक भावनेस पायाखालीं तुडवून पुढें जात होता. जिना चढून नाना दारांत आला. तेव्हां त्याला एक तरुणी पलंगावरून उठून आपल्याकडेच येत आहे असें दिसलें. नाना तिच्याकडे किती न्याहाळून पहात होता ! आपल्या मनांतल्या नागव्या प्रतिमेशीं ही प्रतिमा जुळते किंवा नाहीं हें पहाण्याचें त्याचें कार्य चाललें होतें. बाहेरील तिचा पेहेराव पहाण्याची त्याला मुळींच जरूर नव्हती. त्यामुळें त्याच्या चेहेऱ्यावर जराशी बेपर्वाई दिसत होती.

पण त्याच्या मुखावरची ती बेपर्वाई फार वेळ टिकली नाहीं. ती जसजशी जवळ येत चालली, तसतशी नानाची वृत्ति बदलत चालली. तिचें चालणें किती मोहक होतें ! चालतांना प्रत्येक पावलागणिक होणारा 'छन्' स्वर्गीय संगीताचा आभास उत्पन्न करीत होता. तिच्या त्या गालांतल्या हंसण्यांत इतकें माधुर्य आणि विलास भरला होता कीं, तिच्या-

विषयीं ऐकणाऱ्याला तिच्याजवळ जाण्याची इच्छा होत असे. निसर्गानें तिला तुफान सौंदर्य दिलें होतें. कृत्रिम सजावट तिनें बेताचीच केली होती; तरी तिच्या सौंदर्यांत उणेपणा कुठेंच दिसत नव्हता.

ती जवळ आली. तिनें त्याचा उजवा हात धरला. त्याचें सर्वांग थरारलें! आणि आपोआपच त्याचा हात तिच्या हातांतून झटकला गेला. ती किंचित् हंसली आणि म्हणाली, 'हें काय? चला ना.' असें म्हणतांना तिनें किती गोड भाव केले! काळ्याभोर पापण्याचे केस जणूं तिनें काजळच घातलें आहे असे भासवीत होते. नेत्राचे मधुर कटाक्ष –खरोखरच ते मदनबाण– नानाच्या मनाला वारंवार भेदीत होते. तो स्वतःचें कार्य विसरला. तिच्या रूपांत तोहि मिसळला आणि ती जसें करील तसें करवून घेऊं लागला.

जगांत नाना नुकताच वावरूं लागला होता. कॉलेजांतील कोंवळें पोर तें! भावनावशता आणि विकारवशता त्याचेमागें हात धुवून लागल्या असल्या तर त्यांत नवल काय? घटकेंत एका भावनेच्या विकारानें मन पुलकित होई तर दुसऱ्याच घटकेला दुसरी भावना उद्दीपित होऊन तिचे विकार सुरूं होत.

तिनें त्याला हाताला धरून पलंगावर आणून बसविलें. तीहि शेजारींच बसली. समोरच एक सुंदर स्टूल होतें. सुंदर रंगीबेरंगी सरपोस त्यावर पसरलेला होता. मध्यभागीं फुलपेला— फुलांचा गुच्छ व्यवस्थित तऱ्हेनें बसविलेला–ठेवला होता. त्या पेल्यांत नाना प्रकारचीं फुलें होतीं. त्यांचा सुवास सर्व महालांत पसरलेला होता. त्याच्याच शेजारीं नक्षीचें एक तबक होतें. तबकांत एक सिगरेट–केस आणि काड्याची पेटी ठेवलेली होती. तबकांत हरतऱ्हेचे विडे लावून ठेविले होते. तबकांतील एक विडा तिनें उचलला आणि नानाच्या पुढें केला.

'घ्या ना—' ती म्हणाली.

त्यानें आपला हात तिच्या हातांतील विड्याला लावला आणि तो तिच्या तोंडाकडे पहात राहिला. तिच्या तोंडांतून निघालेले 'घ्या ना' हे शब्द त्याला पुनः ऐकावेसें वाटलें. तिच्या मुखावरील मधुर हास्य-

विलासाची प्रभा त्याच्याहि मुखावर चमकूं लागली. त्यामुळें त्याच्या मुखावर किंचित् हास्याची लहर भासूं लागली.

'घ्या ना!' ती पुन्हां म्हणाली.

तिच्या शब्दाला तहानेलेल्या नानाचें मन आतां शांत झालें आणि त्यानें तो तांबूल घेतला.

'मी हवी होतें वाटतं तुमच्या तोंडांत विडा द्यायला?'

'हवी होते म्हणजे काय? आहांतच ना? आणि जरी विडा तोंडांत घालायचं धारिष्ट केलं असतं तुम्ही तरी काय वाईट झालं असतं?'

'अस्सं,' ती म्हणाली. आणि एक सिगारेट पेटवून तिनें त्याच्या तोंडापुढें धरली. केतकीप्रमाणें तो हात सुंदर होता आणि त्याचा सुवासहि तितकाच मधुर होता.

'छे! मी सिगारेट ओढीत नाहीं.' तो म्हणाला.

तिला यात आश्चर्य मुळींच वाटत नव्हतें; पण आपण आश्चर्यानें स्तिमित झालों असें ती दाखवीत होती.

'तुमचं नांव काय?' नानानें विचारलें.

'माझे नांव बाहेर नाहीं पाह्यलंत तुम्ही?'

'त्या नांवानें माझं तितकं समाधान होत नाहीं. तुमचा हिन्दु पेहेराव पाहून तुम्ही निमाजान असाल, असें नाहीं मला वाटत.'

नानाच्या मनांत त्याची नागवी प्रतिमा उभी राहिली. आणि तो आला त्यावेळीं जसा तिच्याकडे पहात होता, तशाचप्रकारें तो पुन्हा तिच्याकडे पाहूं लागला.

'निमाजान! बोलाना तुम्ही कोण आहांत त्या.' तो पुन्हां म्हणाला.

'याने जर आपल्याला ओळखलं तर काय वाटेल याला?' असा विचार तिच्या मनांत आला. आणि ती किंचित् घाबरलीहि. ती पलंगावरून उठली आणि त्याच्यासमोर उभी राहिली. तिची मान किंचित् खालीं दबलीच होती. अधोवदन निमाजान त्याला त्याची निमाताई दिसूं लागली. लहानपणापासून, तिच्या वयपरत्वें झालेल्या

फरकांचें तो सिंहावलोकन करीत होता, असें एकंदर त्याच्या चेहेऱ्यावर दिसत होतें आणि सहज ' निमाताई ' हा शब्द त्याच्या तोंडातून बाहेर पडला.

तिनें वर पाहिलें. वर पहातांना आपल्या हातानें ती आपले केस सावरीत होती. हाताचीं तीनच बोटें हें काम करीत होतीं. आंगठा आणि करांगुलि बाजूलाच उंच होऊन आपल्या तीन मित्रांचें कार्यकौशल्य मोठ्या अभिमानानें पहात होती. पण तिच्या करांगुलीवरील तीळ नानाच्या दृष्टीस पडल्याबरोबर तो म्हणाला, ' निमा, जातों मी. '

नाना रागानें लाल झाला होता. तो उठला आणि चालूं लागला.

' नाना थांबना—' असें म्हणत ती दारापर्यंत गेली; पण तो परत फिरला नाहीं.

---

# १६

एकादी गोष्ट होऊन जाते आणि नंतर त्या गोष्टीचा पश्चात्ताप होऊन हृदयाला हुरहूर लागते–सारखी तळमळ होते. तसेंच निमाजानचें झालें. लहानपणचे सगळे प्रसंग तिच्यासमोर उभे रहात आणि त्या दिवसांची पुन्हां केव्हांहि चव चाखावयास मिळणार नाही, या भावनेनें ती खिन्न होई. नाना गेला तरी ती किती वेळ तरी दारांत उभी होती. नाना जणूं तिच्यासमोर उभा आहे. आणि ती त्याची क्षमा मागण्याकरितां केविलवाणें तोंड करून उभी आहे ; पण तिची परिस्थिति लक्षांत न घेतां उलट तिला तो वाक्ताडनच करीत आहे. ' अपवित्र तें

अपवित्रच! गाढवाला धुतलें तरी तें उकिरड्यांत लोळणारच!' हेच शब्द तिच्या कर्णरंध्रांत घुमूं लागले.

त्यांचे ते लहानपणचे दिवस. नाना आणि निमा किती आनंदांत आपला वेळ घालवीत! सरोज आणि निमा जवळजवळ सारख्याच वयाच्या पण नानाचें लक्ष निमावर अधिक होतें. निमा नानापासून किती दूर होती. तरी तिची दिवसांतून एकदां तरी भेट घेतल्याशिवाय त्याला चैन पडत नसे. सरोज अतिशय जवळ होती; तरी एक दोन दिवस ती भेटली नाहीं तरी चालत होतें. नाना आपल्या मनाला नेहमी हें पटवी कीं, 'सरोज कुलवान, शीलवान आहे. तिचें आयुष्य सुखकर होईल; पण निमा एका रखेलीची मुलगी–तिचें आयुष्य समाजानें पेटवलेल्या चुडीवर तेला-प्रमाणें टिपकत राहून जळून जाणार! आईचा दोष समाज तिच्या माथीं मारणार! तिला पुनीत करून समाजाच्या चालत्या गाड्यांत आणून बसविण्याचे काम माझें आहे. जशी सरोज तशी निमा; पण दुर्बल निमेला एकटें सोडलें तर——' याकरितां तिच्याविषयीं त्याच्या मनांत नेहमीं सहानुभूति वसत असे. निमाला मात्र नाना आपल्यावर माया करतो इतकेंच समजत असे. ती बारा तेरा वर्षांची होती. समाजांतला आपला दर्जा तिला माहीत होता. नानासारखा खानदानींत वाढलेला तरुण आपल्याविषयीं दुसरें काय स्वतःच्या मनांत बाळगूं शकणार; हा सारासार विचार ती करीत होती. शिक्षण बेताचेंच असल्यामुळें समाजाचें बंड आमूलाग्र उपटून काढण्याची जबर धाडशी महत्त्वाकांक्षा तिच्या अंधार-कोठडींत असलेल्या हृदयाला त्यावेळीं स्पर्श तरी करणें शक्य होतें काय! पण नानाच्या मायेनें तिला त्यावेळीं बरेंच सुखी केलें. नानामुळें तिचा सर्व काल आनंदांत जात होता. नाना दिवसांतून एकदांच तिला भेटे. पण त्यावेळेला तिला जो आनंद होई तेवढा ती आपल्या हृदयाच्या कप्प्याकप्प्यांतून सांठवून ठेवी व पुन्हां ती वेळ येईपर्यंत ती आपला कालव्यय त्याच आनंदांत करी. पण पुढें तिला आपल्या आई-बरोबर अमिराबादेस यावें लागलें. निमा व तिची आई अमिराबादेस आली. तिची आई महाराज सुवर्णगिरी यांचे घरीं कामाला राहिली.

गिरी या दोघी मायलेकींस अतिशय कळवळ्यानें वागवीत. गिरींची पत्नी अतिशय सालस आणि सुस्वभावी स्त्री होती. पण तिचा सहवास गिरींना आणि या दोघींना फार दिवस लाभला नाहीं. म्हणून पुढें घरांतलें सर्व पहाणें सवरणें निमाच्या आईलाच करावें लागलें. जगाचें तोंड गिरींच्यावर वर्षाव करीत होतेंच; पण लवकरच निमाच्या आईनें निजधाम गांठलें. निमा एकटी राहिली. तिचें पांघरूण आतां गिरीच होतें! मोलकरणीच्या तरण्याताठ्या पोरीला–जातीच्या कुलशीलाशिवाय गृहस्वामिनी बनवून घरांत ठेवावयाचें हें गिरींच्या जहागिरदारी जीवाला रुचत नव्हतें. जहागिरदारांची बाहेरख्याली राणीसरकारांच्या पेक्षां ज्यास्ती मानमरातबाची असली तरी ती बाहेरच झाली पाहिजे राणीसरकारांच्या आसनावर बसण्यास त्या नेहमींच नालायख असतात, हें समाजाच्या कायद्यांत असलेलें कलम गिरी पाळीत होते. त्यांनीं तिला आपला विचार कळविला. तिलाहि तो रुचला. गिरींच्या पैशांत लोळून आरामांत पडण्यापेक्षां निराळ्या महत्त्वाकांक्षेचा उद्भव त्या परिस्थितींत तिच्या मनांत कसा होणार ? आणि तेव्हांपासून तिचें वास्तव्य वरील महालांत सुरू झालें. त्या वैभवानें तिला भारून टाकलें. ती सगळें विसरली आणि गिरींच्या रखेलीपणांतच तिला अत्यानन्द वाटूं लागला. ती नाटकी हावभावांत पूर्ण पारंगत झाली. पण नाना शोध काढीत आलेला पाहून त्याला भेटावेसें तिला वाटलेंच. त्यानें आपणांस ओळखूं नये आणि आपली ही मिरासदारी पाहूं नये असें तिच्या मनांत होतें. पण शेवटीं त्यानें तिला ओळखलेंच.

‘ निमा ’ हा कठोर पण जिव्हाळ्याचा शब्द तिच्या कानीं पडला. तेव्हांपासून गिरींच्या विषयीं तिला तिरस्कार वाटूं लागला आणि ‘ आपण आपल्या पायवर धोंडा पाडून घेतला; पण–छे–आपण तरी कसा ! आपल्या परिस्थितीनें तोंड काळें केलें. त्यावेळीं गिरींचें मागणें अमान्य केलें असतें तर—आणखी कोणत्या गर्तेत पडावें लागलें असतें—तें काहींहि असो, आपण नानाच्या प्रेमाला आंचवलों. तो आपला शोध काढीत येथें आला. त्याला काय दिसलें ? हें असलें अपवित्र वर्तन

माझे ! मी निमा अशी स्वतःची पक्की खात्री करून तो गेला—' या विचारांनीं ती धुंद झाली होती. नानानें तिच्या मनावर केलेले संस्कार तिला या वेळीं आठवूं लागले. 'कसं आपलं आयुष्य सुरळीत चालणार! आतां ती आशाच नको. या गिरींच्या नरकांतच आपलें सगळें आयुष्य आपणांस घालवावें लागणार ! ' हे विचार तिचें मन जणूं जाळीत होते. तिला नानाच्या कृतीविषयीं आणि स्वतःच्या प्रतिकृतीविषयीं हुरहूर लागली होती. या एकंदर प्रकारामुळें तिला घेरी आली. ती दरवाजाच्या चौकटीवर डोकें टेंकून उभी होती.

ॐ ॐ ॐ ॐ

निमाजानच्या घरांतून नाना निसटला तों त्यानें आपल्या खोलीचा रस्ता सुधारला. वाटेंत कोणी भेटेल ही कल्पनाहि त्याला नव्हती. तो चौकांत उजव्या बाजूला वळणार इतक्यांत ब्रेकच्या कर्कश संगीतांत एक मोटार त्याच्या पायाजवळ उभी असलेली त्यानें पाहिली.

' या मास्तर ' गिरी म्हणाले.

नानानें मोटारींत पाहिलें. दादासाहेब आणि गिरी हीं दोनच माणसें मोटारींत होतीं. पाठीमागें ड्रायव्हर बसला होता.

' कुठें चाललीय मोटार ? ' त्यानें विचारलें.

' नाहीं—मी नेतोय तिला स्टेशनवर ' दादासाहेब म्हणाले. नानानें आपणाला पाहिलेंच नाहीं, असें त्यांना वाटत होतें. म्हणून आपलें अस्तित्व सिद्ध करण्याकरितां त्यानी अशी कोटी केली.

' अन् नाहीं आलों तर—' नानानें अर्ज फेकला.

' चालायचं नाहीं. ' दादासाहेबांनीं अर्ज निकालांत काढला. ' गृहस्था ! सकाळीं आपल्या खोलीवर मी आलों होतो. विसरलास वाटतं ? '

' माझी तब्येत जरा ठीक नाहीं. ' नाना म्हणाला.

' असं भटकायला तब्येत चांगली आहे ! ' गिरी म्हणाले.

' बरं का नाना, तुम्ही आतां कांहींहि सोंग न करतां बसा झालं. ' दादासाहेब म्हणाले.

नाना नाइलाजास्तव मोटारींत बसला.

स्टेशनवर पोहोंचेपर्यंत कोणी कोणाशीं कांहींच बोललें नाहीं. धवल-पुराहून आलेली मंडळी स्टेशनबाहेर येऊन नुकतीच उभी राहिली होती. अप्पा कांहीं वहान पहाण्याकरिता गेला होता. इतक्यांत तेथें यांची मोटार आलीच. दादासाहेबांचें लक्ष सरलकडे होतें. गिरींचे लक्ष सरोजकडे होतें. सरोज येणार हें जर त्यांना अगाऊ समजलें असतें तर त्यांनीं स्टेशनवर दोन मोटारी आणल्या असत्या. पोषाख कांहीं निराळाच केला असता. नानाचें लक्ष कोठेंच नव्हतें. त्यानें एकवार मंडळीकडे पाहिलें आणि आपलें तोंड बाजूला वळविलें. गिरी आणि दादासाहेब खालीं उतरले. गिरींना पाहिल्यावर सरोजनें तोंड कडू केलें. तिच्या कपाळाला आंठ्या पडल्या. ती कांहीं बोलणार इतक्यांत अप्पा तेथें आलाच. त्यानें एक व्हिक्टोरिया ठरवून आणली होती. पण मोटार आणि दादासाहेबांना पाहून तो म्हणाला, ‘ देतो व्हिक्टोरिया पाठवून. ’

सरोजचा डावा हात तिच्या गळयांतील एकदाणीवर फिरत होता. उजव्या हातानें तिनें ‘ नको ’ म्हणून सांगितलें.

‘ कां ? जाऊं ना आपण सगळे मोटारींतून ! ’ अप्पा म्हणाला.

‘ अरे टपावर कां बसून जायचं अप्पा ? अजून मोटारींत कोणी तरी आहेच. ’ सरल म्हणाली.

इतका वेळ मोटारींतल्या नानाकडे कोणाचेंहि लक्ष नव्हतेंच. सरलेच्या या बोलण्यानें मात्र दादासाहेबांचें लक्ष तिकडे गेलें. ‘ वा ! नाना, उतरा ना. ’ ते म्हणाले.

‘ बरं आहे येथें— ’ नाना म्हणाला.

या दोन वाक्यांत सरोजच्या मतें फारच मोठा शोध लागला होता. ‘ सरल, अग नाना इथं कसा ? ’ ती हळूंच सरलजवळ म्हणाली.

‘ तुझा नव्हे कांहीं तो नाना ! फसशील बरं ! ’

‘ हं ! बरं काय देशील तोच असल्यावर ? ’

‘ अश्शी शाबासकी देईन ! ’ असें म्हणून सरलेनें सरोजच्या पाठी-वर थाप मारली.

दादासाहेबांच्या आग्रहामुळें नानास मोटारींतून बाहेर पडणें भाग पडलें. नानाच बाहेर पडलेला पाहून सरोजला फारच आनंद झाला. हरवलेली आवडती वस्तु सांपडल्यावर 'आतां नाहीं हो विसरायची' ही जी मनाची भावना असते, त्याच भावनेनें ती नानाजवळ आली.

'नाना, तूं इकडे कोणीकडे?' तिनें विचारलें.

'मला समजलं होतं तूं येणार होतीस म्हणून. अन् मी लिहिणार पण होतों येऊं नकोस म्हणून. पण लिहायला घेतलेलं कार्ड तसंच अर्धं राहिलं!'

'समजलं होतं तुला मी येणार म्हणून? मग आतां मला भेटायचं टाळत का रे होतास? नाहीं तुझा राग अझून मावळला?'

'तुझ्यावर रागावलों असं कोण म्हणतं-कोण म्हणतं तसं?'

'तुझी ही वागणूक—'

'सरोज—' इतक्यांत सरोजला सरलेनें बोलाविलें.

'नाना चल.' नाना तिच्याबरोबर गेला. सरला, सरोज आणि नाना मोटारींत बसले. मोहन, दादासाहेब आणि गिरी यांनीं व्हिक्टोरिया पसंत केली. आणि दोन्हीं वहानें घरांकडे निघालीं.

---

# १७

नाना सरोजला स्टेशनवर भेटला त्यावेळीं तिला एक प्रकारचा अद्‌भुत आनंद झाला होता. या मध्यंतरीच्या काळांतल्या घडामोडी साद्यंत त्याला केव्हां सांगेन असें तिला झालें होतें. परंतु ऐकणाऱ्याची प्रवृत्ति तिला तितकीशी योग्य वाटली नव्हती. नानाची वागणूक अति-शय गंभीर झाली होती हें तिला आढळून आलें होतें. शब्दाला एखादाच

प्रतिशब्द त्याच्या तोंडांतून उमटलेला फक्त तिला ऐकावयास मिळे. एकदां त्याच्याशीं पोटभर बोलून काका–काकूविषयीं त्याला पुष्कळ सांगण्याची तिची उत्कट इच्छा त्याच्या अशा अलाघवी वृत्तीपुढें तिला दाबून टाकावी लागली होती. त्यानें तर धवलपुराचें नांवहि काढलें नव्हतें. कधीं कधीं फिरावयास जाण्यास 'तो आणि ती' अशी संधी तिला कधींच मिळाली नव्हती.

पण एक दिवस --

त्या दिवशीं सरला आणि ती सिनेमाला गेली होती. सरोजला बारीक काटा आला होता. म्हणून ती अर्ध्या सिनेमांतूनच घरीं आली आणि निजली. त्या वेळीं नाना नुकताच दादासाहेबांच्याकडे फिरायला जाण्यासाठीं आला होता. परंतु दादासाहेब घरीं नव्हते. अर्थात् सरोज निजली असल्यामुळें तिच्याजवळ बसून बोलणें अपरिहार्यच होतें.

'सरोज—' त्यानें सुरवात केली. ती आपल्या अंगावरचें पांघरलेलें वस्त्र किंचित् बाजूला करून त्याच्या बाजूकडे वळली.

'आज तुला बरं नाहीं वाटतं ?' तो म्हणाला.

'हं ! जरा ताप आलाय्. सरला आणि मी सिनेमाला गेलों होतों. तिथेंच काटा आल्यासारखा झाला.'

'अस्सं–आतां बरं वाटतय् नां ?'

'ही परत फिरण्यापूर्वीची प्रस्तावना आहे वाटतं ?'

'नाहीं–सरोज मी जात नाहीं. हा पहा तुझ्याजवळ बसतों बरं—' असें म्हणून तो तिच्या कॉटवर जाऊन बसला.

'ताप बघ किती आला आहे तो—' तिनें आपला हात त्याच्यापुढें केला.

'छे गं. कांहींसुद्धां नाहीं. इतकं घाबरायला काय झालं ?' हाताच्या नाडीजवळ तिचा हात धरून तो म्हणाला.

'मला भीति नाहीं वाटत–पण नकोसं वाटतं हल्लीं–सगळीं माणसं निर्दय झालीं आहेत–काका, काकू–आणि मला प्रेमळ वाटत असलेला नाना–तो सुद्धां—'

'सरोज--'

'सरोज काय? येथें आल्यापासून माझ्याशीं किती वेळ आणि किती वेळां बोललास?-माझ्याशीं बोलण्याची तुला इच्छा नाहीं होत?'

'सरोज-आज मी असा आहें. उद्यां कसा असेन—कदाचित् समाजाच्या दृष्टीनें मी अनीतिमान ठरेन आणि मग चांगल्या माणसांशीं बोलण्याला मी पात्र राहीन कां?—म्हणूनच सरोज-तेथून निघून येते-वेळीं पत्रांत मी जें लिहिलें होतें, त्याप्रमाणेंच वागण्याचा मी प्रयत्न करीत आहे. माझं तुझ्यावर फार प्रेम होतं—'

'आतां—' ती चटकन उठली आणि तिनें आपला भालप्रदेश त्याच्या खांद्यावर टेकला. आतां फिरून एक करुण स्वर त्याच्या कानांत शिरला.

'आतां—' तो उद्गारला. नानाच्या मनाची फारच धांदल उडाली होती. तिचें मस्तक हलकेंच त्यानें किंचित् उचलून धरलें आणि कांहीं बोलणार इतक्यांत—

गिरी दारांत उभे असलेले त्याला दिसले.

'या-या-' तो कसें बसें म्हणाला आणि त्यानें त्यांना एक खुर्ची निर्दिष्ट केली.

ॐ ॐ ॐ ॐ

यानंतर तिसरे का चवथे दिवशींच नानाला अनीतीच्या वर्तणुकी-बद्दल पुढील एक महिन्याचा पगार देऊन शाळेंतून काढून टाकल्याचें तिला समजलें होतें. त्याच दिवशीं नानाकडून तिला एक चिठ्ठी आली होती.

सरोज—

माझ्या म्हणण्याची सत्यता पटली असेल तुला आतां. मी हा असा आहे. सरोज मी स्पष्ट कांहीं सांगूं शकत नाहीं आणि इच्छित नाहीं.

नाना.

सरलेल्या घरांत नानाची वर्तणूक एवढाच विषय चर्चेकरतां

होता. त्यांत सरला, दादासाहेब आणि हजर असल्यास गिरी–अर्थात् विरुद्ध बाजूला कोणीच नसल्यामुळें एकमतानें भाग घेत असत. आणि त्याच्या वर्तणुकीबद्दल प्रत्येक आपल्यालाच जास्त माहिती आहे, असें दाखविण्याचा प्रयत्न करीत असें. गिरी कोणालाच हार जाणार नव्हते आणि सरोजच्यासमोर तर या गोष्टी बोलण्यास त्यांना जास्त स्फुरण येत असे. त्यांच्या चर्चेतील कांहीं शब्दानुरोधानें सरोजचें मन विचार करूं लागे. ती त्यावेळीं अतिशय विषण्ण होत असे. उदाहरणार्थ गिरी बोलतां बोलतां निमाजानचा उल्लेख करीत—तिला निमा आणि निमाजान यांत फारच साम्य वाटे. नानाकडून आलेलें तें चिठोरे तिनें पुष्कळ वेळां वाचून पाहिलें होतें, परंतु त्यावरून तिला कांहींच सुगावा लागला नव्हता. एकदां दोनदां नानाची त्याच्या खोलीवर गांठ घेण्याचा तिनें प्रयत्न केला होता, पण तो त्या त्या वेळीं, बाहेर गेला असल्यामुळें तिची गांठ पडूं शकली नव्हती. नाना तिच्या मनांतून समूळ नाहींसा व्हावा या दृष्टीनें त्या त्रैमूर्तींनीं नानाची शक्य तितकी जास्ती निंदा चालविली होती.

सरोजला आश्चर्यहि वाटत होतें. तें हें कीं सरलेनें तिला सुख देण्याकरतां आणली होती, पण त्याऐवजीं ज्या वराविषयीं तिनें असंमति दर्शविली होती त्याचीच अप्रत्यक्ष प्रस्तावना चालविली होती. हा गिरिआप्पा अमिराबादेस रहातो हें जर तिला माहीत असतें तर ती कदाचित् आलीहि नसती. कांहीं वेळा तर तिला असेंहि वाटे कीं 'हा माझा विश्वासघात आहे' आणि असें वाटल्यानंतर एक क्षणभरहि तिथें राहूं नये असें तिला वाटत होतें. पण एकाएकीं तेथून तिला हलणें अशक्य होतें. सोबतीचा प्रश्न होता. तरी सुद्धां तिनें पुन्हां धवलपूरला जाण्याबद्दल सरलेजवळ गोष्ट काढली होती आणि ती एकटी जायलासुद्धां तयार असल्याचें तिनें सांगितलें होतें. परंतु तिला तशी परवानगी मिळाली नसल्यामुळें तर सरलेच्या वागणुकीची तिला जास्त शंका येऊं लागली होती.

पण ती करणार काय!—

त्याचवेळीं अमिराबादेस सरलेला पोंचविण्याकरितां घेतलेल्या १॥ महिन्याच्या रजेंतील शेवटचे चार दिवस बहिणीच्या घरीं घालविण्याकरितां मोहनहि तेथें आला होता. त्याला या बाबतींत खरें खोटें पहाण्याकरितां सांगावें असें सरोजच्या मनांत कितीतरी वेळां येत होतें. पण त्याच्याशीं या बाबतींत बोलण्याचा तिला धीर नव्हता. कारण ' शिकलेल्या मुलींसुद्धां प्रेमामुळें फसतात ' असें त्याच्या तोंडचें वाक्य तिनें ऐकलें होतें. त्यावरून नानाविषयीं त्याचा गैरसमज झाला असावा अशी तिनें आपली समजूत करून घेतली होती. शिवाय तिच्याशीं बोलण्याचें औत्सुक्यहि तो दाखवीत नसल्यामुळें तिला त्याच्याशीं बोलणें किंचित् लाजिरवाणें वाटत होतें. नानाविषयींच्या एका शंकेचें समाधान व्हावें असें मात्र तिला फार वाटत होतें. काळाच्याबरोबर नानाविषयीं ती जास्त साशंक होत चालली होती. तसें होणें चांगलें नव्हतें हें तिला पटत होतें.

पण काय करावें— तिला कांहीं सुचत नव्हतें.

---

## १८

शेवटीं, मोहन आज जाणार अशा वेळेला—

' आजच जाणार तुम्ही ? ' सरोजनें मोहनला विचारिलें.

' हो गेलचं पाहिजे आज मला. हॉस्पिटलमध्यें उद्यां आपरेशन आहे. ' तो म्हणाला.

' दुसरे डॉक्टर असतीलना ? '

' केस माझी आहे ती. '

' नाहीं गेलं तर— '

' चालायचं नाहीं. तार वाचलीत कां तुम्ही. '

' वाचली कीं— '

' कांय होतं त्यांत–आपरेशन महत्वाचं आहे माझ्याशिवाय होणार नाहीं तें–शिवाय मंदा वाट पहात बसली असेल ' तो हंसत म्हणाला.

पण सरोजला कसं यावं हसूं !

' मंदा वाट पहात बसली असेल–हें जास्त महत्वाचं असेल— ' शेवटीं ती खोचून बोललीच.

' तसं म्हणा पाहिजे तर !' आपल्याला कोणी कांहीं म्हणालें तरी चालतें असें त्याला दाखवावयाचें होतें जणूं. मोहनशीं बोलतांना आडवे तिडवे प्रश्न फोल ठरतात हें या त्याच्या उत्तरामुळें सरोज उमजली आणि—

' पण–दोन दिवस नाहीं गेलात तर—माझं एक काम होतं तुमच्याकडे—' ती म्हणाली.

' सांगा !–माझ्यानें असलेल्या वेळांत होत असल्यास पाहीन. ' तो म्हणाला.

' नाहीं होणार तें त्या वेळांत— ' सरोज झटक्यानं म्हणाली आणि तिनें आपलें तोंड बाजूला वळविलें.

' नाइलाज आहे सरोज. Doctor's time is not his own आणि सरकारी डॉक्टरना तर तें फारच जाचक असतं. '

' बरं, नाहीं ना होत तुमच्यानें—' मोहन कांहींच बोलला नाहीं

' सरळ नाहीं म्हणवत नाहीं वाटतं ? ' संतापानें रुद्ध झालेल्या कंठांतून निघालेले शब्द मोहनच्या कानावर पडले. तिच्या डोळ्यांत जमलेले ढग मोहनला पहावेनात. कांहींच उत्तर न देतां स्नानगृहांत तो शिरला. सरोजच्या मनांत त्याच्याविषयीं कितीतरी वाईट अन् चांगले विचार विद्युत्चमकेप्रमाणें येऊन गेले. मोहनचें सडेतोड वागणें चांगलें आहे कां नाहीं ? हें तिनें मुळींच ठरविलें नाहीं मनाशी. मोहनची तरुण मुलींशीं वागण्याची सचोटी आणि कर्तव्याची आस्था तिला पटल्याशिवाय राहिली नाहीं. व्यवसाय बदलला कीं माणसांचीं हृदयं बदलतात कीं काय ? मोहन शिकत असतांना असलेलं याचं कवि–हृदय डॉक्टरीच्या व्यवसायांत

अगदीं निष्ठुर बनलं अं ऽ! निर्बल तरुणींच्या डोळ्यात साचलेलें—मातट पठारांतून वहात असलेल्या नद्यांच्या पाण्याप्रमाणें—गढूळ पाणी पुरुषांना दिसत असूनसुद्धां त्याचा विचार पुरुष करीत नाहींत. भविष्यांतल्या वैवाहिक प्रेमरज्जूंचीं बंधनें असल्याशिवाय स्त्रियांना मदत करण्याची इच्छा त्यांना होत नाहीं. पुरुषसमाज, स्त्रीदाक्षिण्य—स्त्रीदाक्षिण्य म्हणून पोकळ ओरड करणारा आहे, अशी तिची खात्री होत चालली होती. प्रेमाला व्यवहार माहीत नसतो. 'प्रेम लाभे प्रेमळाला,' Love is devine या वाक्यांचा तिला तिटकारा येऊं लागला. प्रत्यक्ष व्यवहारांत प्रेम व्यवहारी आहे या पूर्वीपासूनच्या तिच्या कल्पनेला दृढतर स्वरूप येत होतें.

मोहन स्नानगृहांत शिरल्यानंतर ती बाहेर बराच वेळ वरील विचार करीत उभी होती. नंतर थोड्या वेळानें ती स्वत:च्या खोलींत गेली. तिच्या पाठोपाठ सरलेनेंहि प्रवेश केला.

'अप्पा कांहीं बोलला तुला?' सरल म्हणाली, 'चार दिवस आलीस माझ्या इथं आणि असलं कांहीं नको व्हायला. आनंदांत रहा.' पहिलें वाक्य बोलून सरल थांबली असती तर सरोजला फार बरें वाटलें असतें. पुढच्या सरलेच्या भाषणांत जरा तुटकपणा असावा असें तिला वाटलें; पण तिनें तें दाखविलें नाहीं.

'नाहीं—.' सरोज म्हणाली.

'मग अशी सुकल्यासारखी कां दिसते आहेस?'

'माहीत आहे तुला आणि उगीच कां विचारून मला त्रास देत आहेस?'

'हल्लीं तुला क्षणाक्षणाला लोकांच्या बोलण्याचा त्रास होऊं लागला आहे.' सरल म्हणाली. त्या अशाच कांहीं वेळ बोलत राहिल्या असत्या तर त्यांचें भाषण कोणत्या थराला गेलें असतें कुणाला माहीत! अलीकडे अलीकडे म्हणजे या दोन तीन दिवसांत त्या दोन मैत्रिणींचें असेच संवाद होत; पण तेवढी वेळ निघून गेल्यावर बाजी—चिमाजीच्या प्रेमानें त्या वागत. सरल नकळत तिच्याशीं जरा बेपर्वाईनें वागूं लागली होती. साहाजिकच आहे. पतीच्या धोरणावर आपलें धोरण बांधणारी ती

एक स्त्री होती. गिरींच्याशीं सरोजचा विवाह होणें हें दादासाहेबांच्या परिस्थितीच्या दृष्टीनें फार चांगलें होतें. आणि दुसरीकडे आपल्या अत्यंत प्रिय मैत्रिणीचा विवाह—तिच्या मर्जीविरुद्ध व्हावा हें सरलेला पूर्ण पटणें शक्य नव्हतें. त्यामुळें ती कधीं कधीं जरा तुटकपणा दाखवी तरी तो तेवढ्यापुरताच असे.

आज तिला फार वेळ बोलावयास मिळालें नाहींच. ती बोलत असतांनाच नाना आलेला तिनें समोरच्या आरशांत पाहिला आणि लगेच ती घरांत गेली.

नानाला पहातांक्षणींच सरोजच्या कपाळाला आंठ्या पडल्या. कां कोणास ठाऊक तिला त्याच्याशीं बोलावें असें वाटत नव्हतें. पण तिची स्थिति मात्र चमत्कारिक झाली होती. असून अडचण आणि नसून खोळंबा असेंच नानाच्या सान्निध्यांत आणि गैरहजेरींत तिला झालें. वास्तविक अमिराबादेस सरोजच्या दृष्टीस तो पडला त्यावेळीं 'आतां नाहीं गं बाई पुन्हा कधीं विसरायची' असेच उद्गार तिच्या तोंडून बाहेर पडले होते.

तोच नाना आज तिच्यासमोर उभा होता. तो येण्यापूर्वी 'नानालाच भेटून त्यालाच खरें काय तें विचारावें' असें तिच्या मनांत आलें होतें. त्या आक्षेपार्ह प्रसंगानंतर कर्णोकर्णीं आणि मुखोमुखी नानाच्या वर्तनाविषयीं निंदात्मक उद्गार निघूं लागले होते. म्हणून आतां त्याच्याशीं बोलण्याचीसुद्धां तिला इच्छा होईना. उलट कुटिल माणसाकडे आपण जितक्या तिरस्कारानें पहातों, त्याच्याहिपेक्षां ज्यास्ती तिरस्कार तिच्या नसानसांतून बाहेर पडत होता. 'तो कोण?—ओळख?—तोंड ओळख तरी आहे कां आमची?—' हाच जणूं शब्दसमुच्चय तिच्या तोंडावर नाचत होता.

नानाला हा सरोजचा अवतार समजला नव्हता असें नाहीं. त्याला कल्पना आली कीं, 'उठलेल्या वावटळींत सांपडलेले—जवळचे असोत—नात्याचे असोत—त्यांचे एकमेकांवर निर्व्याज प्रेम असो—ही प्रेमळ वृत्ति असल्या झंझावातांत टिकणें अशक्यच! सरोज तरी असल्या

परिस्थितींत अपवादात्मक कशी ठरेल ? बोलणारीं हजार तोंडं!! हीं सगळीं हजार तोंडं सगळीं खोटं बोलतात कीं काय ? त्यांत सत्य असल्याशिवाय त्याचा गवगवा होणं शक्यच नाहीं. ' चक्षुर्वै सत्यम् ' असायला जगाचे डोळे कुठें धड आहेत ? आणि म्हणून जगाच्या तोंडावरच विश्वास ठेवणें भाग आहे. मी वाईट चालीचा असें सगळें जग म्हणत असतांना सरोजनें माझ्यावर विश्वास कां ठेवावा ? जगानें त्याज्य, बहिष्कृत ठरविलेल्या माणसांशीं, नेहमीं जगांत वागून जगाशीं संबंध ठेवणाऱ्या व्यवहारी माणसाला कसा संबंध ठेवतां येईल ? पाण्यांत राहून माशाशीं वैर करून कसें चालेल ? इत्यादि प्रकारचे विचार सरोजला पाहिल्याबरोबर त्याच्या मनांत सुरू झाले. हेच विचार दादासाहेबांच्या घरांत शिरण्यापूर्वी त्याच्या मनांत आले असते तर तो आलासुद्धां नसता तिच्याकडे. त्या घरांत शिरण्यापूर्वी त्याचें मन सुन्न होतें असें मुळींच नाहीं. पुष्कळ आनंदी होता तो आज आणि म्हणूनच कुतर्की विचार ओझरतेसुद्धां त्याच्या मनाला शिवले नव्हते. घरांत—तिच्या खोलींत–निःस्वागत प्रवेशल्यावर त्याच्या दृष्टींत शून्यता आली. आणि ती शून्य दृष्टि आजूबाजूला फिरल्यावर त्याला तेथें उभेहि राहूं नये असें वाटूं लागलें.

तो निघाला तेथून.

कांहीं हट्टामुळें लहान मुलांच्या समोर पुष्कळ वेळ चहाचा कप पडून रहातो, तें चहा घेत नाहीं असें पाहून त्याची आई तो कप उचलावयास लागते, मूल त्याला रुदन अस्त्रानें चांगलाच विरोध करतें, मनांतून पाहिजे असलेला चहा हट्टानें घेत नसतें तें मूल ! अगदीं तसेंच सरोजचें झालें. आतांपर्यंत नको असलेला नाना, तो जावयास निघाला त्यावेळीं हवासा वाटूं लागला. त्याचे पाऊल दारांतून बाहेर पडलें, तोंच—

' नाना—' तिनें हांक मारली.

त्यानें मागें वळून पाहिलें. तिरस्काराच्या जागीं आतां कळवळ्याची छटा उमटत होती. त्याला थांबावेंसें वाटलें थोडा वेळ. पण तो थांबला नाहीं. त्यानें आणखी दोन पावलें पुढें टाकलीं.

' नाना—!' आर्जवी, साधारण कर्कश आणि रडवा असा स्वर

त्याचे कानावर आला. त्यानें मागें पाहिलेंच. तिचे डोळे पाण्यानें टच्चून भरले होते. त्याला जाववेना. तो मागें फिरला.

' नाना—मी एक विचारूं कां तुला ? '

' खुशाल विचार. '

' ती गोष्ट खरी आहे कां ?

' कोणची ? '

' गिरी म्हणतात ती. '

' मला विचारून काय उपयोग ? चोराला चोरी केलीस कां म्हणून विचारण्यासारखं आहे हें तुझं. चोर खरं सुद्धां चोरणारच ! '

' नकोरे असली थट्टा करूंस—सांग ना. '

' काय सांगूं ? मी सांगून त्याचा इष्ट असा कांहींच परिणाम होणार नाहीं. माझ्या सांगण्याबोलण्यावर जर तुझा विश्वास असता तर तूं मला असें विचारलेंच नसतेस आणि माझी अवहेलनाहि पण केली नसतीस. '

' मी मुद्दाम नाहीं तसं केलं—मी फार वाईट आहे-होऊन गेलं तसं. क्षमा कर मला— '

' क्षमा आणि शिक्षा कोणालाच करणें माझ्या अधिकारांत नाहीं. मी असमर्थ आहे म्हणेनास आणि क्षमा कशाकरितां करायची ? जिथं शिक्षाच नाहीं तिथें क्षमेचं काय प्रयोजन ? '

' तुसड-तुटक बोलायचं ठरवून आला आहेस वाटतं आज खोलीवरून ? '

'मला पाहिल्यावर कैकयीचा अवतार धारण करावयाचा तुझाच बेत अगोदर ठरला असला पाहिजे. त्याशिवाय इतका चांगला प्रवेश वठला नसता. '

' तसं होतं कधीं कधीं—मी कबूल करतेना- प्रेमाच्या गोष्टी अशाच असतात.—न्यूटनचा थर्ड लॉ—Action and reaction is equal and opposite. आहे ना माहीत तुला ? '

' आयुष्याचें असें शास्त्र बनलें असतें तर कोणीहि कोणच्याहि

गोष्टीचा प्रयत्न केला नसता. ठराविक रुळावरून गाडी ढकलतांना ती ठराविकच स्टेशनें घेणार हें माहीत असतें ना ?'

'तसं नव्हे, प्रेमासारखा अमोघ अधिकार हातीं असतांना क्षमा आणि शिक्षा करण्याचा अधिकार निसर्गतःच येतो, असं मी म्हणतें.'

'हें प्रेमाचें तत्वज्ञान आहे. हा व्यवहार नाहीं. तत्वज्ञान आणि व्यवहार यांत उत्तर-दक्षिण ध्रुवाइतकें अंतर असतें.'

'आपण बाग लावावी, त्या नाजुकशा वेलींना सुंदरशा कळ्या याव्यात, उद्यां त्या विकसल्यावर आपल्याच ही भावना असते. आणि कोणी तरी तिसऱ्यानेंच त्या कळ्या नाहींशा केल्यावर काय होईल-बरं वाटेल ?'

'सरोज, मला वाटतं आपलं हें कांहींतरी बोलणं चाललं आहे.'

'कांहीं समज-काय होईल परिस्थिति त्याची ?'

'बरं नाहीं वाटणार त्याला-पण व्यवहारांत तसं होतं त्याला कांहीं उपाय नाहीं.'

'पण हे असे उलटे व्यवहार चालतात, ते तसेच अव्याहत चालत रहावेत असं वाटतं कां तुला ?'

'हा तुझा द्राविडी प्राणायाम आणि पृथ्वीप्रदक्षिणा मी ओळखली आहे, समजलीस ? तुझीं विधानें जरी विसंगत असलीं तरी तीं एकाच दिशेनें वहात आहेत, हें मी जाणून आहे; पण व्यवहार अगदीं निराळा आहे.'

'व्यवहार ! व्यवहार !! व्यवहार !!! हें काय व्यवहाराचं बंड ?'

'बंड कां वेड ? व्यवहाराचा जय होत असतांना तो बंडवाला कसा ? आणि खरं सांगूं सरोज, व्यवहारी असणें फार चांगलें असतें; बरं पण आतां 'शॉर्टकट' घे. पृथ्वीप्रदक्षिणा पुरे. हं सांग तुला काय सांगायचं आहे तें.'

'ओळखलंस ना तूं ?'

'कोंबडीनं कितीहि उडण्याचा प्रयत्न केला तरी ती कां आकाशांत उंच उंच भराऱ्या मारूं शकेल ?'

' पण आजकाल कोंबडीची उडी कुंपणाच्या बाहेर जाऊं लागली आहे.—मर्यादा सोडलीय तिनें. '

' तें कसं–तूं पाहिलंस प्रत्यक्ष ? ऐकलं असशील कोणाच्या तरी तोंडून–विश्वास बसतो तुम्हा लोकांच्या बोलण्यावर ? '

' प्रत्येक गोष्ट सगळ्यांनाच कुठें पाह्यला मिळते ? '

' अस्सं ! अस्सं ! अच्छा, गुड–बाय. '

' तुला परत बोलावलं तें इतक्या लवकर जाण्याकरितां वाटतं ? '

' आतां कशाला या गोष्टी करतेस ? मी आलों तेव्हां मी येथें बसावें असें वाटत तरी होतें कां तुला ? वस्तूंच्या भावांत नेहमी चढ-उंतार होतात; तशीच व्यवहारांत माणसांच्या किंमतींत भरती–ओहोटी असते. '

' पण मी चुकलें म्हणतेंना–चुकलें मी–आज येथेंच जेवायला रहा तूं. राह्यलंच पाहिजेस. '

' आज नाहीं तें चालायचं हं कांहीं—मी रागावेन नाहीं तर ! '

' तूं कधीं रागावत नाहींस ! तुझ्या रागाची मला संवय आहे म्हणून ठीक आहे—'

' अं हं तसलं बोलायचं नाहीं आतां कांहीं—तसं न बोलायला काय दंड घेशील ? '

' दंड घेईन तर—' नानानें किंचित् हसून तिच्याकडे पाहिलें. थोड्या वेळानें नानानें पुन्हां बोलण्यास सुरवात केली.

' बाकी स्त्रियांचा स्वभाव फार विचित्र असतो. '

' असेल !'

' पण त्यामुळं लोकांना त्रास होतो—त्याचं काय ?

' सोसावा. '

' तें कसं काय बुवा ! लोकांनीं कां सोसावा ? '

' मी म्हणतें म्हणून ! '

' तूं म्हणशील वाटेल तें. '

' मग नाहीं ऐकणार तुम्ही माझं ? '

' या ' तुम्ही ' ची उत्पत्ति कशासाठीं ! '

' तुम्हीं मोठे नाहीत कां माझ्यापेक्षां ? वडील माणसांना ' अहो-जाहो ' म्हणावं असा नियम आहे. '

' इतक्या दिवस मी तुझ्यापेक्षां लहान होतों वाटतं ! '

' पण आतां किती दिवस ' अरे-जारे ' म्हणायचं ! लहान कां आहोंत आतां आपण ? दहा वर्षांपूर्वी आपण धवलपूरला खेळत होतों. आठवतंय कां ? आतां ते दिवस गेले. दुसऱ्याला खेळवण्यासारखे झालोंत आतां आपण-नाहीं कां ! '

' हो ! हो ! ! आजीबाई. '

आज जणूं काय सारखं बोलायचं ठरवलें होतें दोघांनीं पुष्कळ दिवसांत—पुष्कळ कसल्या अलीकडे दोन तीन दिवसांत त्यांची मुळींच गांठ पडली नव्हती; पण तितका अवधीसुद्धां त्यांना सहन झाला नाहीं. सरला चहाचे कप घेऊन आली नसती तर किती वेळ दोघे बोलत बसलीं असतीं कोणास ठाऊक ? ती आल्यावर तिनें सरोजला अंग धुण्याची व जेवणाची आठवण करून दिली, त्यामुळें त्यांना फार वेळ बोलत बसल्याची जाणीव झाली.

' हो ! बरं वैनी ! दादासाहेब घरीं नाहींत वाटतं ? मी आल्यापासून दिसले नाहीत ते घरांत. ' नाना म्हणाला.

' नाहीं दिसणार. एका वेळेला दोन कामं जशीं करतां येत नाहींत तसं एका वेळेला एकच गोष्ट पहातां येते. '

' थट्टा करता होय माझी ! सांगाना आहेत कां ते घरांत. '

' तें नव्हे होऽजाऊं द्या झालं ! घ्या हं चहा— '

' पण तुम्हाला काय माहिती मी आलों आहें तें. '

' जादू नाहीं माझेजवळ तसं आपोआप ओळखायला. धडधडीत मी पाहिलं तुम्हाला. '

' चहाची जरूरी नव्हती-खरोखर ! '

' हल्लीं टाकलं आहे वाटतं सगळं ! कांहीं म्हणा नाना, तुम्ही पूर्वींचे नाहीं राहिलांत. '

' पण कोण जातो म्हणायला कांहीं. कबूल आहे मला–घर फिरायला लागलं कीं घराचे वासे सुद्धां फिरतात. '

बोलतां बोलतांच चहापान उरकलें होतें. नंतर नाना जावयास निघाला; पण सरोजनें न जाण्याविषयीं त्याला मानेनेंच खुणाविलें. बोलण्यानें जें काम होणार नव्हतें तें तिच्या मानेच्या हेलकाव्यानें केलें. तो थबकला थोडासा. सरलेच्या लक्षांत हें गौडबंगाल आलें.

' रहाना–त्यांची गांठ घ्यायचीय ना ? ' ती म्हणाली.

' हं रहाच आज. आजच्या दिवसानें कामाचे नऊबारा होत नाहींत अगदीं ! ' सरोजनें पुष्टि दिली.

' नाहीं. तें खरं; पण मला आतां अमिराबाद सोडण्याची प्रबल इच्छा झाली आहे. '

' कारण ? ' सरल म्हणाली.

' कशाला उगीच विनाउद्योग दिवस काढायचे ? त्यांतून मला शक्य आहे कां विनाउद्योग इथं राहणं ? '

' मग जाणार तरी कुठं ? '

' कां ? जगांत अशी एकहि जागा नाहीं मला शांततेनें रहातां येण्यासारखी ? '

ज्यास्ती बोलणें म्हणजे नानाच्या विचारांना चालना देण्यासारखें होतें. म्हणून कांहीं न बोलतां सरला व सरोज आंत निघून गेलीं, जातांना पुन्हा एकदा सरोजनें नानाला राहाण्याविषयीं बजाविलेंच.

परंतु तो राहिला नाहीं.

---

# १९

' दादासाहेब, आज जवळजवळ एक महिना होत आला तरी मी सांगितलेल्या कामाकडे तुमचें बिलकूल लक्ष नाहीं. जाणत आहांत ना मी कोण आहे तें ? '

‘ गिरी, या गोष्टी मला सांगायची कां जरूरी आहे ? मी मला होईल तितका प्रयत्न सारखा चालविला आहे. आणि त्यांत परमेश्वर कृपेनें यश येण्याचें सुचिन्ह पण दिसूं लागलें आहे. परवाची गोष्ट सरोजला सांगितल्यापासून काय सांगूं गिरी ? पोर अगदीं सचिंत असते. डोळ्यादेखत नानासारख्या उपटसुंभाशीं तिचें मी कसें लग्न जमवीन ? आमच्या तिची मैत्रीण आहे ती ! ’

‘ आजपर्यंत अशीच साखर पेरलीत; पण ज्यावेळीं मी तुमच्या घरीं असतो, त्यावेळीं मला साखरेचीं फळं मात्र कडूच मिळतात. याला जबाबदार कोण ? ’

‘ पण या गोष्टी एकदम कां जमून येत असतात ? ’

‘ समजलं सगळं मला. खाल्ल्याघरचे वासे मोजीत आहांत ! ’

‘ रागावूं नका गिरी.–रागावायचं कांहींच कारण नाहीं. माझं अन्न माझं अन्न म्हणून जर तुम्हाला म्हणायचं असेल तर खुशाल म्हणा. मग मी आहे आणि तुम्ही आहांत. माझा स्वभाव तुम्हाला माहिती नसेल तर घ्याच एकदां अनुभव— ’

‘ याला काय म्हणायचं दादासाहेब–तुम्ही जर असं करूं लागलात तर मी काय करूं ? माझा सगळा आधार तुम्ही आहांत. चुकलों, क्षमा करा. तुमच्याकडे आज वडीलपण दिलंय खरं. ’

‘ तेंच सांगतोंना ! मला तिचंसुद्धां हित–अनहित पाहलं पाहिजे. आणि तुमच्या घरीं नांदण्यांत तिचें हित आहे, म्हणूनच मी प्रयत्न करतों आहे. तिचं नुकसान व्हावं अशी माझी केव्हांहि इच्छा नाहीं. ’

‘ बरं—पुढचा प्लॉट काय आंखला आहे ? ’

‘ येन केन प्रकारेण तिच्या मनांतलें नानाचें ठाणें उठवून लावाववयाचें. ’

‘ तें कसें काय ? परवाच्या पत्रव्यवहाराचे कांहीं उत्तर ? ’

‘ हो ना ! तो जाणार आहे तिकडे. इतका दूर तो राहिला म्हणजे सहाजिकच एकमेकांस विस्मरण होतें. ’

‘ तें खरं; पण आतां सन्देशवाहक कांहीं दुर्लभ नाहींत. पत्रोपत्रीं देखील परिचय वाढतो. ’

‘ शंका कांहीं अनाठायीं नाही.—पण त्याच्या मनांत जर हिचे ठाणें असेल तर फार लांब रहाणें देखील फायद्याचें नाहीं. ’

‘ सरोजबद्दल तो तितका आसक्त झाला असेल असें नाहीं वाटतं. ’

‘ शक्य आहे. ’

‘ दादासाहेब, मला एक युक्ति सुचली आहे. ’ असें म्हणून गिरी दादासाहेबांच्या कानांत कांहींसें गुणगुणले.

‘ तें पुढें–’ दादासाहेब म्हणाले.

नंतर चहापान् वगैरे झाल्यावर गिरींनीं शॉफरला मोटार बाहेर घ्यावयास सांगितलें. त्यांनीं दादासाहेबांना फिरायला चलण्याचा पुष्कळ आग्रह केला; फार वेळ झाला असल्यानें दादासाहेबांनीं फिरायला जाण्याचें नाकारलें; मग गिरींनी दादासाहेबाना त्यांच्या घरीं पोहोचविलें आणि नेहमीच्या जागीं गाडी नेण्यास शॉफरला बजाविलें.

रात्रीं दहाचा सुमार. रस्त्यावर तुरळक तुरळक लोक चालले होते. या वेळेला गर्दी कोठून असणार ! त्या वेळेच्या या रस्त्याची गर्दी म्हणजे मोटर आणि व्हिक्टोरिया यांचीच असायची; पण त्याहि आज फारशा दिसत नव्हत्या. गिरींची मोटार भर वेगांत चाललेली होती आणि लवकरच ती ठराविक ठिकाणीं येऊन पोहोंचली.

भय्या दारांतच उभा होता. तो खिशांतले आजपर्यंत साचलेले कागद काढून पहात होता. पहातां पहातां खिशांतून एक पाकीट बाहेर निघायला आणि गिरींची गाडी तिथें उभी रहायला एक गाठ पडली. तें पाकीट पुन्हां खिशांत घालायचें तो विसरलाच होता. गिरी मोटारींतून बाहेर आले. त्यांच्या दृष्टीस तें पडलें.

भय्या घाबरलेला दिसत होता. घाबरतच त्यानें सांगितलें, ‘ बाईसाब चली गई यहांसे. ’

‘ क्यॅ ? ’ आश्चर्यानें गिरींनीं विचारलें.

‘ निमाजान गई. ’

'हाँ. हाँ. किदर चली गई!'

'मालुम नहि साब.'

'मालुम नहि! किदर था तूं!'

'यहां ऐसा खडा था.'

'तुझ्या समोरून गेलीना ती!'

'हाँ—'

'लाज नाहीं वाटत? काय सांगितलं होतं तुला मी! माझ्या परवानगीशिवाय तिला कुठं सोडूं नकोस म्हटलं होत ना मी!'

'अब्बी आयेंगी बोलके गयी तो अबी तक नहि आइ. क्या कहूं साब?'

'रड. काय करतोस? घरीं कां नाहीं आलास मला सांगायला इतका वेळ?'

'आयाथा. अपने कहा की जाव. अबी ये वक्त हम कुछ नहि चहाता.'

इतक्यांत खालीं पडलेल्या पत्राकडे त्यांचे लक्ष गेलें. तें त्यांनीं उचललें आणि पत्ता वाचला—

'नारायण गंगाधर काळे,—अस्सं अस्सं.'

'हें पत्र कुठलें?' त्यांनीं भय्याला विचारिलें.

'ये पोस्टके पेटीमें डालने के लिये दिया है बाइसाबने.'

'अच्छा!' म्हणून त्यांनीं पत्र फोडलें.

प्रिय नाना,

तुझी माझी शेवटची भेट व्हावी आणि तुझी मुक्तकंठानें क्षमा मागावी या हेतूनें मी हें पत्र लिहीत आहे. जगण्यापेक्षां मृत्यु बरा असें आतां वाटायला लागलं आहे. कारण जगांत मला करतां येण्यासारखं कांही राहिलं नाही. मला जर चांगलं लिहितां आलं असतं तर आज-पर्यंतच्या किती तरी गोष्टी तुला कळवायच्या होत्या. त्या लिहून ठेवल्या असत्या.

अखेरची इच्छा डोळे भरून तुला पहावें अशीच आहे. मग येशील कां आज स्टेशनावर. मी आज दहाचे गाडीनें जाणार आहे. येच आणि या तुझ्या ‘ निमेला ’ तुझ्या भेटीचें अमृत पाज.

तुझी निमा.

पत्र वाचल्याबरोबर दादासाहेब मोटारींत येऊन बसले. आणि स्टेशनवरच चलण्यास त्यांनी शोफरला सांगितलें.

पण दहाची गाडी निघून गेली होती आणि स्टेशनवरहि कोणी दिसलें नाहीं.

---

# २०

हंसरी रजनी हसत होती. गालांतच होतें तिचें हंसणें. पण त्या हंसण्यांत किती मधुर संवेदना होत्या ! आनंदाच्या उन्मादानें बेहोष झालेलें हृदय असेंच हंसतें. बोलून दाखविण्याचें सीमोल्लंघन केलेलें तें सुख आणि तो आनंद असतो.

तिच्या हास्याचे धवलतुषार वस्तुमात्रावर उडत होते आणि त्यामुळें तो सगळा सृष्टीचा भाग प्रोत्साहित होत होता.

सुललित वहात असलेली सरिता कुठें चालली होती इतक्या मंद गतीनें कोणास ठाऊक ? सख्या सागरास भेटावयास जात होती म्हणावें तर प्रियकराची भेट घ्यावयाचें औत्सुक्य तिच्यांत दिसत नव्हतें. वाटेंत एखादी मैत्रीण भेटणार होती तिला आणि तिला घेऊन सागराला भेटायला जायचें जरा धोक्याचेंच होतें. म्हणून ती विचार करीत आपला

मार्ग आक्रमीत होती. पण ‘ होणारें न चुकेची ’ हें ती जाणून होती तरी त्या भेटणाऱ्या मैत्रिणीला टाळण्याचा प्रयत्न चाललाच होता.

किती लपत, छपत, थबकत, हळूं हळूं ती चालली होती. स्त्रीसुलभ चालण्याची ढब अगदीं गोडस दिसत होती. चालतांना पृष्ठभागावर रुळत राहिलेला शेपटा रजनीच्या प्रकाशांत चकाकत होता. रेल्वे पुलावरच्या विजेच्या दिव्यांचीं प्रतिबिंबें शेपट्यावर लावलेल्या चकाकणाऱ्या कलाबतूचीं निदर्शक होतीं. ती जाणाऱ्या दिशेकडे जरा लांबवर पाहिलें तर तिनें जणूं पान्यूचा गजरा डोक्यांत घातला आहे असें वाटत होतें.

प्रियकराला भेटायला जाणें, मैत्रिणीला टाळणें या दोन बाबतींतच तिचे विचार चालले होते. आपल्या बाजूनें कोण कोण जात आहे, काय काय करीत आहे याकडे बिलकूल लक्षच द्यावयाचें नाहीं असेंच जणूं ठरवून धिम्मेपणानें ती आपला मार्ग आक्रमीत होती.

चांदण्यारात्रीं त्या नदीचें वालुकामय तीर एक प्रशस्त क्रीडांगणच बनत असें. अमिराबादच्या वस्तीला फिरायला जाण्याजोगें हवाशीर ठिकाण तेंच होतें. निसर्गाची बाग ती—प्रसन्न वातावरण आणि रमणीयता यांत यत्किंचित् देखील कमीपणा नव्हता. अशा त्या उद्यानांत फिरायला जाण्याचें भाग्य अमिराबादेस आहे. आणि या ईश्वरी देणगीचा तेथील लोकांनीं कधींच अव्हेर केला नाहीं.

पण अशा आडवेळीं तेथें कोण असणार ? रात्रीचा साडेदहा अकराचा सुमार. सगळें अमिराबाद अगदीं शांत झालें होतें. स्टेशनवर शंटिंग करणाऱ्या गाडीचा कर्कश आवाज मधून मधून ऐकूं येई. एवढीच शांततेला ठिगळ लावणारी गोष्ट म्हणायला हरकत नाहीं.

मात्र नदीच्या कांठाकांठानें चालत असलेलें एक माणूस आज यावेळीं तेथें दिसत होतें. थोडा वेळ चालावें, मध्येंच थोडा वेळ थांबावें आणि नदींत पाय बुडविल्यासारखा करून पुन्हां वरती काढावा, पुन्हा चालूं लागावें, असें आपलें त्या माणसाचें चाललें होतें. मध्येंच मनाशीं एखादें अर्धें मुर्धें वाक्य बोलावें. त्या व्यक्तीच्या एकंदर चालण्यावरून, थांबण्यावरून आणि त्रस्त स्वरांत एकादें वाक्य बोलण्यावरून असा

खालीलायख अदमास करतां येत होता कीं, या प्राण्याच्या हृदयाचें सुकाणूं भलतीकडेच फिरलें गेलें असावें आणि तें जाग्यावर आणण्याच्या प्रयत्नांत निराशा होऊन आतां अगदीं हृदयच बंद पडण्याची वेळ आली असावी.

असें बराच वेळ झाल्यावर ती व्यक्ति तिथेंच नदीकांठीं बसली.

कोणी तरी स्त्री होती ती आणि तिच्याकडे एक मनुष्य सारखा टक लावून पहात होता. हें तिच्या लक्षांत नव्हतें आलें. त्याची दहाची गाडी चुकल्यामुळें तो तेथें उगीच हवा खाण्याकरितां आला होता. दहाच्या गाडीनंतर दीडची गाडी एक्स्प्रेस होती. त्या गाडीनें जाण्याचा त्याचा विचार होता. ही बाई जर त्याला दिसली नसती तर तो खुशाल नदीच्या कांठीं जाऊन आरामांत बसला असता. आणि ती बाई दिसल्यावर देखील तो आतां उभा असलेल्या ठिकाणीं, तिच्याकडे सारखें पहात उभे रहाणें, चांगलें नव्हतेंच; परंतु तिच्या त्या वेळच्या घर-सोडीच्या वृत्तीमुळें त्याला तेथून हलावें असें वाटेना. तो पुष्कळ दूर होता, तरी ती तरुण आणि सुंदर असावी हा जो त्यानें तर्क केला तो खराच होता.

‘ प्रवाहांत सांपडल्यावर त्याच्याबरोबर वहात येणारे काटेकुटे वेली-झुडुप आणि कधीं कधीं मोठमोठे वृक्षसुद्धां नामोहरम होतात त्या प्रवाहाच्या वेगापुढें. चांगले गुण, उत्कृष्ट सौंदर्य यांचा उपयोग जगाला व्हावा, अशी त्या अभिलाषी परमेश्वराची केव्हांच इच्छा नसतें असें दिसतें. तिला जन्म देण्यापूर्वी म्हणजे तिची घडण पूर्ण झाली तेव्हां ब्रम्हदेवाला तिच्या रूपाविषयीं कांहीच कल्पना आली नाहीं आणि आतां तिचें सौंदर्य विकसन झाल्यावर, असली वस्तु आपल्याकरितांच पाहिजे म्हणून तिला कालप्रवाहांत ओंढ्याप्रमाणें सोडून स्वर्गाच्या बंदरावर आणण्याचा त्याचा बेत दिसतो आहे.’

‘ मग ज्यांना आपण देव म्हणतो, त्यांचें देवपण कशांत आहे? या सुलतानशाहींत? सुलतानशाही, सैतानाशिवाय कोणाला गाजवितां येणार? देव हे सैतानच नाहींतर काय?—’

असले काही तरी विचार तिला निरखीत असतांना त्याच्या मनांत

येत होते. एकदां तर त्याला वाटलें, ' जावें तिच्याजवळ–विचारावें तिला–पण अनोळखी स्त्रीबरोबर बोलायचें म्हणजे आपल्या मनांत काळेंबेरें आहे असें तिच्या मनांत काळेंबेरें यावयाचें—छे, नकोच तें—नसता उद्योग कशाला पाहिजे आपल्याला !'

इतक्यांत ती पाण्यांत शिरतांना त्याला दिसली. आतां मात्र पहावेना त्याला, तो तडक निघाला, त्या जागेपर्यंत पोहोंचण्यापूर्वीच ती दिसेनाशी झाली.

' डुबक डुबक ' असे कितीदा तरी आवाज आले. त्या जागेपासून निघणारे पाण्याचे भोवरे तेथें पाणी पुष्कळ असावें हें दाखवीत होते. ती कुठें बुडाली असावी याचा आदमास पाण्याच्या हालचालीवरून काढणें शक्य होतें.

त्यानें आपले कपडे उतरले आणि तो पाण्यांत शिरला. पुष्कळ वेळ पाण्यांत उभे राहून त्यानें चहूंकडे पाहिलें; परंतु ती पाण्याच्या पृष्ठभागावर कोठेंच दिसेना. मात्र एका जागीं पाण्याची हालचाल अजून कायम होती. त्या स्थळीं जाऊन पहाण्याचें त्यानें ठरविलें. त्याला दुसरें–तिसरें कांहींच दिसत नव्हतें. त्याचें लक्ष त्या विशिष्ट कार्याशीं एकरूप झालें होतें, तो त्या जागेपर्यंत पोहोंचला.–एक बुडी मारली–ती आणि तिच्या गळयांतून एक दोरी लोंबकळत असतांना त्याला दिसली. दोरी तोडून टाकायला पाहिजे होती; पण तोडायला त्याचेजवळ कांहींच साधन नव्हतें. तो पुन्हां पाण्याच्या वरती आला. कपडे काढलेली जागा पुष्कळ दूर आहे असें त्याला आढळून आलें. तेथून चाकू आणणें शक्यच नव्हतें. त्यानें पुन्हां बुडी मारली आणि ती दोरी ओढली त्याबरोबर खालच्या खालीं कांही गळल्याचा त्याला भास झाला, हायसें वाटलें त्याला. बाईनें गळयांत बांधलेला धोंडा गळाला होता.

त्या दोरीला धरून तो तिच्याजवळ गेला, तिला त्यानें बगलेंत मारली आणि तो काठावर घेऊन आला.

कांही विशेष झालें नव्हतें. किंबहुना विशेष व्हायला वेळच मिळाला नव्हता. ती जरा घाबरली होती इतकेंच. गळयांत बांधलेला

दगड फारच जड होता. तो बरोबर वागवून पाण्यावर तिला तरंगतां येणें शक्य नव्हतें.

तिच्या कपाळावर आणि तोंडावर आलेले केस त्यानें बाजूस केले. कोणी तरी ओळखीची ही बाई असावी असा त्याला दाट संशय आला. पण त्या कल्पनेवर त्याचा पूर्ण विश्वास बसेना. चांगल्या ओळखीच्या अशा कोणत्याच स्त्रीवर जीवित–त्यागाचा प्रसंग आला असेल असें किंचित् वाटणें देखील त्याच्या कल्पनेच्या मर्यादेबाहेरचे होतें. येऊन जाऊन फार झालें तर कदाचित् सरोज असा वेडेपणा वेळप्रसंगीं करील असें त्याला वाटत होतें. परंतु तिची येथपर्यंत मजल जायला एवढे असं कांहींच झालें नव्हतें आणि दुसरी गोष्ट, त्याच्या मांडीवर ती निश्चेष्ट पडलेली स्त्री सरोज खास नव्हती हें त्याच्या नंतर लगेच लक्षांत आलें.

त्याला वाटलें रस्त्यांतून जातां येतांना नेहमीं दृष्टीस पडणारी ही स्त्री असावी.

‘ कोणी कां असेना ती! पुढें काय करावयाचें, ठेवायची कुठें, तिला न्यायची कुठें—’

इतक्यांत तिनें जरा हालचाल केली. तिच्या त्या नाजुक हालचालीबरोबरच तिनें आपले डोळेहि किंचित् उघडले होते.

डोळे उघडून ती त्याच्याकडे पहात होती. तिच्या दृष्टींतली तरलता त्याच्या ओळखीची साक्ष पटवीत होती. ओळखली तिला त्यानें. तिनें पुन्हां डोळे मिटले!

‘ निमा—’ त्यानें हांक मारली.

‘ अंतच पाह्यचा ठरविलं होतं कीं काय?’ डोळे उघडून ती म्हणाली.

‘ माझी खात्रीच होईना कीं निर्मला इतकी वेडी असेल अशी!’

‘ हं–वेडी–शेवटी मीच वेडी!’

‘ बरं पण निमा, पातळ बदलायचं नाही कां? मीसुद्धां अगदीं मूर्खासारखा तुला ओलेतीच घेऊन बसलों आहे.’

‘ असूं दे. मला हा ओलेपणा कांहीसुद्धां करणार नाहीं. ही

एवढी सर्वदमक मात्रा माझ्याजवळ आहे कीं, तीच आतां शैल्यशामक होईल.'

'अरे वा! थांब जरा. धोतर घेऊन येतो मी!'

'धोतर?'

'होऽ. इथं कुठून आणायची तीं तरतऱ्हेचीं पातळं?'

'नाना!'

'क्षमा कर अं.'

तो धोतर आणावयाला गेला. त्याच्या 'येथें कोठून येणार तरतऱ्हेचीं पातळं?' या वाक्यानें अगदीं मर्मीं घाव बसल्यासारखें तिला झालें!

"लांडगा आलारे लांडगा आला" या गोष्टीसारखेंच झालें म्हणायचें, असें ती कांहींसें पुटपुटली. 'जगाचा खटारा फक्त दृश्य प्रमाणालाच मानतो.' असे तिचे विचार चालले असतानाच नाना धोतराची घडी घेऊन आला.

"इश्श, केवढी ही धोतराची घडी?" ती म्हणाली, "आतां काय जाडजूड बाडं वापरायचं ठरवलं आहेस कीं काय?"

"काय बिघडणार आहे नाहीं तरी. आतां काय इम्प्रेशन मारायला थोडच जायचय मला? पण ती जोडी आहे. अझून जशीच्या तशी आहे. होईल कीं नाहीं त्याचा तुला तलम पातळासारखा उपयोग?'

"अगबाई, खरंच कीं." ती म्हणाली. "पण--"

"पण? पण काय?--लाज-लाज वाटतीय तुला?"

"नाना--"

'हं, निमा-चल आटप-नेस.'

तिच्या त्या कमानदार आकृतीकडे त्याचे डोळे लागले होते. त्याला वाटलें क्षणभर, 'पाप आहे हें. मनांत स्त्रीविषयीं इतकी आसक्ति! पाप आहे.' तशांत देखील तो थोडा मनांत हंसला. 'अरे, या विसाव्या शतकांत पाप-पुण्याच्या व्याख्या बदलल्या आहेत!' हेंच त्या हास्याचें कारण होतें!

तिचें नेसून झालें होतें.

' नाना, आज आपण येथेंच राहूया गडेऽअं ? '

' आणि उद्यां—? '

' उद्यां! उद्यां!! '

' हो. उद्यां–उद्यांचा विचार स्त्रियांना करणें कर्तव्य नसतें काय ? '

' उद्यां येथेंच राहूया–अं ? '

' आणि परवा ? '

' परवाचं हरी— '

' उद्यांपर्यंतचीच फक्त तयारी आहे वाटतं ? खुळी ! '

' खुळी, वेडी, तोंडाला येईल तें–हं–बोलायचंना ? '

' निमा–साधी निमा किती सुंदर दिसते, आणि किती पवित्र दिसते–निमा पवित्र झालीस तूं–पावन झालीस तूं–या गंगेचं स्नान–आणि शुभ्र वस्त्र–खरोखर पुनीत झालीस तूं निमा. '

त्यानें तिचा उजवा हात आपल्या हातांत धरला होता. तिच्या त्या सुंदर मूर्तीकडे पहाणें म्हणजे त्याला कांहीं चमत्कारिकच वाटूं लागलें होतें. स्वैरसंचारक चंद्रम्यानें त्याची दृष्टि वेधली होती. त्याला राग आला त्या चंद्राचा. ' विश्वांत पापी जर कोणी असेल तर–तर हा कुत्सित हास्यानें भरलेला आणि मोठ्या दिमाखानें आणि निर्लज्जपणानें युगुलांचे प्रणय पहाणारा चंद्र—' नानाच्या मनांत लाखोली मोजणें चाललें होतें, हें जणूं चांदोबाला समजलेंच–तो बिचारा चटकन् ढगाआड झाला.

त्यानें तिला जरा आपल्याकडे ओढली.

' नाना, हें काय ? ' ती म्हणूं लागली. ' हें काय ? '

' निमा चंद्रसुद्धां लाजला तुझी ही मंगल मूर्ति पाहून–आनंद नाहीं होत तुला ? '

भारावलेल्या अंतःकरणांतून निघालेले जड जड शब्द—तिला कल्पनाच करवेना. ' पुरुषांचीं हृदयें कशाचीं बनतात कोण जाणे ? विकारांची जाळी जशी— ' तिच्या मनांत आलें.

त्याच्या तोंडून शब्द उमटणें शक्य नव्हतें. तो निश्चलतेनें तिच्याकडे टक लावून पहात होता.

'नाना, पाप आहे हें!' कोणी मोठ्यानें बोलल्याचा त्याला भास झाला. तो दचकला. तिचा हात सोडून देतांना तो मनाशींच मिस्कि-लपणे पुटपुटला, 'पाप आहे हें—'

त्याची दृष्टि पुन्हा सहज चंद्राकडे गेली. चंद्र ढगाआडून लपून त्यांचेकडे पहात आहेसे त्याला वाटलें.

---

# २१

रात्रींच्या प्रकारानंतर गिरींना सुवर्णकुटींत बिलकूल दम निघेनासा झाला. सकाळ उजाडते केव्हां, आणि आपण दादासाहेबांच्या घरीं जाऊन त्यांची गांठ घेतों केव्हां असें त्यांना होऊन गेलें. त्यांनीं बाहेरच्या जाळींत बसून पाहिलें, कारंजाचे तुषार हातावर झेलण्याचा प्रयत्न केला; पण व्यर्थच. आकाशांतल्या चंद्राच्या विहाराकडे पहात कांहीं रम्य कल्पना कल्पण्याचा प्रयत्न करणेंहि त्यांनीं सोडलें नाहीं. परंतु एकच एवढीशी गोष्ट सगळ्या गोष्टींच्या तोंडाशीं येऊन बसली होती. ती कांहीं केल्या इतरांना पुढें येण्यास वावच देईना. शेवटीं गड्याकरवीं बाहे-रच पलंग वगैरे आणून त्या वेलींच्या जाळींत विराम पावण्याचा त्यांनीं निश्चय केला.

गादीवर अंग टाकलें आणि फारच थोड्या वेळांत त्यांना झोंपहि लागली.

* * * *

आजची पहाट गिरींना अगदीं रम्य कालाप्रमाणें वाटली. ते उठले.

प्रातर्विधी उरकून त्यांनीं स्नान केलें आणि कपडे वगैरे चढवून मोटारी-सह ते दादासाहेबांच्या घरीं आले.

'या हो!' दादासाहेबांनीं गिरींना उत्थापन देऊन त्यांचें स्वागत केलें. आणि 'चहा बघ ग जरा' शेजारींच उभ्या असलेल्या सरलेला ते म्हणाले. ती निघून गेली. पुढें ते म्हणाले, 'आतां आमचं तुमच्याविषयींच बोलणं चाललं होतं.'

'अस्सं का?' स्वतःला नीट बसवीत गिरी उत्तरले, 'काय-काय चाललं होतं?'

'कांहीं नाहीं आपलं हेंच कीं—'

'बरं दादासाहेब—' दादासाहेबांना पुढें न बोलूं देतां गिरींनीं बोलण्यास आरंभ केला. 'तुम्हाला कांहीं बातमी समजली कां?'

'कांहीं नवं आहे काय?'

'तर काय हो! तुमच्या सरोजनं वरपरीक्षा मात्र फक्कड केली अं!'

'म्हणजे?'

'म्हणजे नाना निमाबरोबर निघून गेला.'

इतक्यांत चहा घेऊन सरलेनें प्रवेश केला. तिनें हें वाक्य ऐकलेंच होतें. गिरींच्यापुढें तो कप ठेवून सावकाशपणें ती म्हणाली, 'पण गिरींना कोणी सांगितलें कीं, नाना म्हणजेच सरोजचा परीक्षिलेला वर आहे म्हणून?'

'हें पहा माझा तसा मुळींच दुराग्रह नाहीं कीं, नानाला तिनें वरावें. तसें नसेल तर मला त्यांत आनंद आहे. मला तरी वाटेल कां कीं सरोज कुणातरी उपटसुंभाची गृहिणी व्हावी—काय दादासाहेब?'

'गिरी, चहा निवून चालला आहे ना—' दादासाहेब म्हणाले. गिरींना कोणीतरी म्हणायला पाहिजेच होतें कीं, 'चहा घ्या' म्हणून. दादासाहेब तसें म्हणाल्यानंतर त्यांनीं चहापानास सुरवात केली. चहा पितां पितां ते म्हणत होते, 'प्रेम म्हणजे काय हो?'

'प्रेम? प्रेम म्हणजे आपुलकी.' दादासाहेब म्हणाले.

'प्रेमाचें परिणत स्वरूप म्हणजे लग्न कां?'

'असेंच कांहीं म्हणतां येत नाहीं.'

'मग सरोजचें काय म्हणे 'नानावर प्रेम होतं'—तर त्या प्रेमाचं काय व्हायचं होत पुढें ? लग्नच कीं नाहीं ?'

'अहो, पण तुम्हाला असं कोणीं सांगितलं कीं सरोजचं नानावर प्रेम होतं म्हणून ! हा कां त्या बिचारीवर जुलूम ?' इतका वेळ उगीच गप्प असलेली सरल म्हणाली.

'बरं बुवा तुमच्या सरोजच्या ऐवजीं दुसरं कोणीतरी त्या जागेवर आहे असं समजू—माझा सांगण्याचा मुद्दा असा कीं, हल्लीचे तरुण-तरुणी विनाकारण प्रेमाच्या नांवाखालीं तरुणपणाच्या संवेदनांना वाव देतात. आणि तेंच त्याना पाहिजे असतें. यापेक्षां मी त्यांच्या या पवित्र प्रेमाला ज्यास्त किंमत देत नाहीं.'

'तें कांही वाईट नाहीं म्हणा !'

'मला बाकी प्रेमाचं तत्त्वज्ञान फारसं कळत नाहीं--परंतु त्याचं जें बाह्य स्वरूप तें या प्रकारचं असतं एवढं मात्र दिसतं.'

'दादासाहेब, तुमची कल्पना होती कांहो अशा प्रकारची ?'

'माझ्या आजपर्यंतच्या कल्पना कधीं बरोबर ठरल्याहेत—आतां असं ठरवलय गिरी, कीं साप साप म्हणून भुईच बडवायची.'

'म्हणजे ?'

'म्हणजे आजपर्यंतच्या वागणुकीच्या उलट—गोष्टींच्या चांगल्या बाजूकडेच फक्त 'आ' वासून न बसतां प्रथम वाईट बाजूच विचारांत घ्यावयाची आणि त्याप्रमाणें आपलें वागण्याचें धोरण ठेवावयाचें. नाना—सरोज आणि सगळ्याच गोष्टी—सोन्याचा मुलामा दिलेल्या तुळशीबागेतल्या बांगड्याच जणूं ! तुम्ही सांगितलेली गोष्ट ऐकून माझ्या मनावर इतका वाईट परिणाम खरोखर होऊं पहात आहे—आणि सारखा विचार करीत आहे. शाळेची कीर्ति, प्रतिष्ठा आणि ती आदर्श कशी होईल या बाजून केलेले विचार, नव्हे त्या विचारसातत्याचा प्रवाह गंगेसारखा कुठें पातळांत लुप्त झाल्यासारखें वाटत आहे.'

थोडावेळ कोणी कांहींच बोललें नाही. दादासाहेबांची ही विम-

कतेतील नाट्यछटा कोणीच भंग करूं इच्छित नव्हतें. वातावरण एकदम ीर झाल्यासारखें झालें होतें. सरलेला, आतां येथें उभें रहाण्यांत कांहीं ं नाहीं असें वाटून कीं काय कोण जाणे, ती घरांत जाण्यास निघाली. ्रां गिरींनी तिला न जाण्याविषयीं सांगितलें. तिला नाइलाजानें तेथें ा रहावें लागलें—तिचें मन मात्र लागेना त्या खोलींत. ती खिडकीच्या ठीवर तोंड ठेवून उभी राहिली होती. "या खिडकीचे गज एकदम नाहींसे ्यावर आपलें तोंड बाहेर पडेल–आणि एकदम मोकळया वाऱ्यांत—" ा विचार आला कीं काय, कोण जाणे तिच्या मनांत ? खिडकीच्या ांना ज्यास्ती घट्ट धरण्याचा आणि गजावर तोंड रेचून बसविण्याचा विर्भाव मात्र तिच्या हालचालींत दिसून आला.

दादासाहेबांनीं आपल्या डाव्या हाताचा पंजा गालाला लावून ार टेबलावर टेकलें होतें. त्यामुळें त्यांची नजर सहाजिकच टेबला- च खिळली होती. उजव्या हातांतील पेन्सिल आलटून पालटून, आवाज ्रतो न निघतो अशा बेतानें त्यांच्या हातांतून टेबलावर पडत होती.

गिरींची दृष्टि खोलीभर चकरा मारीत होती. दादासाहेबांचे एकं- भाषण ऐकावयाची मात्र त्यांना अनावर इच्छा झाली असावी असें ची चर्या सांगत होती. दादासाहेब आतां कांहीं बोलतील, थोड्या वेळानं ायला सुरुवात करतील असें त्यांना वाटत असावें. कारण वारंवार ते ्यावर एक एक दृष्टिक्षेप करीत राहिले होते.

आतां दोघांची दृष्टादृष्ट झाली होती. एकच सेकंद दोघांनीं एक- ांकडे पाहिलें आणि दोघांच्याहि नजरा पुनः पूर्ववत् अलग होऊन पआपलीं पूर्वीचीं कामें बजाऊं लागल्या.

थोड्या वेळानें दादासाहेब खालच्या नजरेनेंच म्हणाले, 'गिरी, ना निमाला घेऊन गेला हें खरं आहे कां ?'

दादासाहेबांचे विचार थांबून ते आपल्यावरच प्रश्नांची सरबत्ती ् करतील, अशी गिरींना कल्पना नसल्या कारणानें त्यांना हा पहिलाच ्न थोडा चमत्कारिक वाटला.

'म्हणजे ? मी इतका वेळ सांगितलं तें खोटं वाटतं ?'

'नाहीं गिरी, तुम्ही सांगायला इतका—म्हणजे पुष्कळ वेळ नाहीं घेतलात-सांगितलंत किती चट्कन्; पण मला मात्र तें मी काय ऐकलं हें शोधण्यालाच इतका वेळ लागला—आणि तुम्ही खोटं सांगतां असं मी म्हणालों कां? मी विचारलं 'तें खरं आहे कां?' खोटं आहे असं मी नाहीं म्हणालों.'

'वा! दादासाहेब, मला समजत नाहीं अशी तुमची समजूत झालेली दिसते—नसेल समजत कदाचित् मला; पण तुम्ही आतां जें बोललात तें सगळं मला समजलं. बरं जाऊं दे तें. नाना निमाला घेऊन निघून गेला, यांत तुम्हांला आश्चर्य आणि खेद वाटण्यासारखें काय आहे? अधर्म हाच ज्यांचा धर्म त्यांनीं तुमच्या समजुतीचा अधर्म केला म्हणून तुम्हाला त्याबद्दल विषाद मुळींच वाटायला नको.'

'कां नको वाटायला?—' दादासाहेब म्हणाले. 'गिरी, तुम्ही एकाद्याचं कांबळं काठीवर घेऊन अगदीं नाचायलाच लागतां.'

'हे शब्द तुम्ही मला ऐकवायला नको होते.'

'मी आणि खासगी बोलतो आहे हें तुम्ही आपलं भाग्य समजा. आणि गेला कशावरून हो तो तिला घेऊन?'

'माझ्यावर विश्वास नसेल—आणि नाहीं असं दिसतंहि आहेच—हें पहा—पहा हे!' गिरींनीं आपल्या खिशातून एक पत्र काढून दादासाहेबांच्यासमोर टाकलें.

दादासाहेबांनीं तें पत्र वाचलें आणि गिरींना विचारिलें, 'तुमच्याजवळ कसं आलं हें पत्र?'

'मी कांहीं न्यायमंदिरांत उभा नाहीं आणि तुम्हीहि न्यायाधीश नाहींत, तेव्हां तुमच्यासमोर मी जाब द्यावा! पण लक्षांत ठेवा. दादासाहेब, तुम्ही माझा विश्वासघात करीत आहांत.'

'विश्वासघात? याला विश्वासघात म्हणत नाहींत.'

'आजपर्यंत मी तुमच्यावर विश्वास ठेवला. तुम्ही मला थापा दिल्यात. आज एकदम आपलं रूप प्रगट करूं लागलात. वास्तविक मी या लग्नाच्या फंदांत पडत नव्हतो. माझी लग्न करण्याची बिलकुल

इच्छा नव्हती. त्या इच्छेला तुम्ही चालना दिलीत. तिला जागं-केलंत—आणि आतां—'

' मी अझून म्हणतो, तुम्ही लग्न करा. तुम्ही लग्न केलंत तर बरं होईल. तुमचं घर गृहिणीशिवाय शोभणार नाहीं; पण तें करीत असतांना हे असले नासके आणि कुसके प्रसंग निर्माण करण्याची प्रवृत्ति सोडून द्या. अशानें स्वतःचा फायदा न होतां दुसऱ्याच्या आयुष्याचा नाश होतो. नानाच्या आयुष्याला—सरोजशीं लग्न करण्याच्या हेतूनें तुम्ही विनाकारण कलंक लावीत आहांत. वाईट आहेत या गोष्टी. सरोजच्या मनांत तुमच्याशीं लग्न करावयाचें नाहीं. तिच्यावर मी जुलूम करू शकत नाहीं. म्हणून तुम्ही लग्नाचा नाद सोडून द्या असें मी आतां-सुद्धां म्हणत नाहीं. कां असें मी म्हणतो आलं तुमच्या लक्षांत? आपल्या शिक्षण संस्थेच्या दृष्टीनें विचार केलात तर तुम्हांला समजून येईल तें. मी अगदीं उघड सांगावयाची जरूरी आहे असें मला वाटत नाहीं. तुमचें तुम्ही तें समजा.'

' अस्सं! याचे परिणाम?'

' मला माहीत आहेत—तशी मी व्यवस्था केली आहे.'

' पण एका दृष्टीनें तुम्ही सरोजच्या दुःखाला कारणीभूत होत आहांत—ही गोष्ट निमापासून लपवून ठेवून निष्कारण तिला तुम्ही नाना विषयीं आपलेपणा वाटायला लावणार आहांत. त्यांत तिचें सर्वस्वीं नुकसान आहे हें निदान तुम्ही विसरूं नये असें मला वाटतें.'

' पण ती आहे कुठें येथें? ती कालच गेली आपल्या घरीं निघून. काल रात्रींच गेली येथून.'

' एकूण येथपर्यंत तुम्ही आपला डाव साधला काय? बरं जातो मी दादासाहेब. हा विश्वासाचा खून, शिक्षणाचा टेंभा गिरविणारे तुम्ही करीत आहात!'

' गिरी, माफ करता कां? तुम्ही हे नसते उपद्व्याप केले नसते तर मी आणखी प्रयत्न केला असता, पण आतां माझी इच्छा नाहीं.'

गिरी उठले आणि चालूं लागले. जातां जातां त्यांनी अगदीं

विचित्र नजरेनें दादासाहेबांच्याकडे पाहिलें. त्यांत मत्सर, द्वेष, क्रोध ओतप्रोत भरला होता; परंतु यापेक्षां ज्यास्ती ते कांहींच करूं शकणार नाहींत हें दादासाहेब जाणून होते.

---

# २२

पावसांत पडणाऱ्या कोवळ्या उन्हाचा रम्य देखावा नाना आपल्या ऑफीसच्या खोलीच्या खिडकींतून पहात उभा होता. आतां कोणच्याहि कामाची गडबड त्याच्या पाठीमागे नाहीं असें त्याची चर्या दाखवीत होती आणि त्याचमुळें तो देखावा पहाण्यांत तो दंग झाला होता. त्याच्या तोंडावर हास्याची झुळूक उमटली होती. कदाचित् त्याला वाटलें असेल कीं, 'पावसांत ज्या वेळेला ऊन पडतें, त्या वेळेला पुष्कळ लोक त्याला नागवा पाऊस म्हणतात. किती भेसूर आणि विसंगत कल्पना आहे ही! कोणा कवीच्या किंवा कल्पकाच्या डोक्यांतल्या मेंदूतून ही कल्पना निघाली कोण जाणे!' वगैरे विचार त्याच्या डोक्यांत डोकावत असावेत व त्यामुळेंच त्याच्या मुखावर किंचित् हास्य दृष्टिगोचर होत असावें. याच्या उलट म्हणजे, त्याला असेंहि वाटत असलें पाहिजे कीं, 'गौरकाय रमणीच्या मुखावरचें हास्यतुषार म्हणजेच हा देखावा!' एकूण त्याला तो देखावा आवडला म्हणूनच तो पहाण्यांत तो रमला होता.

इतक्यांत फोनवरच्या बेलचा आवाज त्याच्या कानीं आला. फोनजवळ जाऊन त्यानें रिसीव्हर कानाला लावला. आणि नंतर थोड्या वेळानें त्यानें एक चिठ्ठी लिहून प्यूनजवळ दिली आणि ती हेड क्लार्कला देण्यास सांगितलें. नंतर त्यानें पटकन् आपला ओव्हर कोट चढवला आणि

तो बाहेर पडला, समोरच्या टॅक्सी-स्टँडवरच्या एका टॅक्सीला त्यानें बोलाविलें व जगदीशप्रसादकडे चलण्यास त्यानें त्याला सांगितलें.

भय्यासाहेब एकटेच एका आरामखुर्चीत सिगारेटचे फवारे सोडीत बसले होते. नानाला आलेला पाहिल्यावर त्यांनीं किंचित् शरिराची चळवाचाळव करून त्याला शेजारच्या खुर्चीवर बसण्यास सांगितलें. त्यांचा चेहरा म्लान आणि सचिंत दिसत होता. आज नाना तेथें आल्यापासून जवळ जवळ दोन अडीच महिने होत आले होते; परंतु भय्यासाहेब एकहि दिवस त्याला आनंदी आणि हसतमुख दिसले नव्हते. सदानूकदा तोंडांत सिगारेट आणि त्या धुराच्या वलयाकडे त्यांची दृष्टि. तीसुद्धां कशी अगदीं भेसूर, अशांत आणि अर्थहीन असावयाची. नाना आल्यापासून ऑफिसमधील कामावर ते फारसें लक्ष देईनासे झालें होतें. आणि त्यांच्यानें काम पण होईनासें झालें होतें. सुदैवानें असिस्टंट मॅनेजरची निवड करतांना त्यांना नानाची—त्यांच्या तरुणपणच्या सवंगड्याची आठवण झाली आणि त्याचा कसा तरी पत्ता मिळवून ते त्याला तिकडे बोलावूं शकले. त्याच्या कामाविषयीं त्यांना खात्रीच होती. वास्तविक भय्यासाहेब नानाहून पुष्कळच मोटे. कॉलेजच्या पहिल्या वर्षांत त्याचे ते प्रोफेसर होते—आणि तेव्हांपासूनच त्याची आणि त्यांची चांगलीच ओळख आणि दोस्ती जमली होती. पुढें भय्यासाहेबांना तसल्या शिक्षणसंस्थेत काम करण्याचा कंटाळा आला होता, म्हणून त्यांनीं ती नोकरी सोडून दिली. त्याचवेळीं कलकत्त्याच्या एका प्रख्यात विमा कंपनीनें त्यांना ‘ इन्स्पेक्टर ऑफ एजन्सीज ’ च्या जागेवर नेमिलें. घवलपूरलाच त्यांचें ऑफीस होतें. नाना त्यांच्या ऑफीसमध्यें कधीं कधीं जात असे. त्यानें विमाशास्त्राची त्यांच्याकडून बसल्या बसल्या चांगली माहिती करून घेतली होती, आणि त्यानें वीस पंचवीस हजारांचा बिझिनेस पण भय्यासाहेबांना सहज मिळवून दिला होता. भय्यासाहेबांच्या घरीं मात्र तो कधींच गेला नव्हता. भय्यासाहेबांनीं या जागेवर असतांना आपल्या भागांत कंपनीचा चांगलाच बोज आणि व्याप वाढविला होता. ही त्यांची कामगिरी लक्षांत घेऊन कंपनीनें त्याना कलक-

त्याच्या हेड ऑफीसमध्यें दक्षिण हिंदुस्थानांतल्या शाखांवर आणि एजन्सी-ज्वर देखरेख करण्याकरतां एक स्वतंत्र जागा निर्माण करून नेमिलें होतें.-कामाचा ज्यास्ती व्याप म्हणून म्हणा किंवा भय्यासाहेबांच्या वाढत चाल लेल्या दुर्बलतेमुळें म्हणा—त्यांना आणखी एका हुशार माणसाची जरूर होती. म्हणूनच त्यांनी मुद्दाम दक्षिण हिंदुस्थानी आणि हुशार अशा नानाला तिकडे बोलावून घेतलें होतें.

पण नानाला पहिले भय्यासाहेब आजपर्यंत कधींच दिसले नाहींत. तो मनाशीं या फरकाचा नेहमीं विचार करीत असे. त्याला भय्यासाहेबां-विषयीं विमाकंपनी—प्रोफेसर—त्याचे धवलपूरचें आफीस—आणि आतांचें काम याशिवाय त्यांच्या बाकीच्या गोष्टी माहीत नसल्यामुळें त्याच्या विचारांचें जग अर्थात्च मर्यादित होतें. आज त्याचा फोन आल्याबरोबर तो धांवतच निघाला होता त्यांच्या आफीसमधून. येतांक्षणींच भय्या-साहेबांच्या तोंडांत सिगारेटचें थोटूक होतेंच. नानाला बसायला सांगि-तल्यावर त्यांनीं तो तुकडा फेकून देऊन दुसरा पेटविला होता. नानानें एकवार नव्या पेटविलेल्या सिगारेटवर दृष्टि टाकली आणि तो म्हणाला, ‘ भय्यासाहेब, मी एक विनंति करूं का तुम्हाला ? ’

‘ नाना ! समजलों मी. मी सिगारेट फार ओढतो, हें चांगलं नाहीं असंच ना ? ’

‘ भय्यासाहेब, अगदीं खरं आहे हें. एक तर तुमचा उत्साह, तेज, शरीर. सारं या सिगारेटमुळें नाहींसें झालें आहे—’

‘ नाना, जवळ ये असा ! ’ नाना किंचित् जवळ सरला. ‘ मी सिगारेट कां ओढतो माहीत आहे तुला ? तुझं अजून लग्न नाहीं झालं, नाहीं ना ? ’

‘ कां ? लग्न झाल्यावर काय सिगारेट ओढण्याचा परवाना मिळतो कीं काय ? आणि म्हणून मग वाटेल तितक्या पाकिटांची राख करायची ?’

‘ तसं नव्हे—माझीं दोन लग्नं झालीं आहेत. तुला माहीत नसेल कदाचित्. ’

‘ म्हणून तुम्ही डबल सिगारेट ओढतां वाटतं ? ’ तो किंचित् हंसला.

'ऐकायचय कां तुला ? वास्तविक म्हणजे मी तुला आतां असं कांहीं तरी बोलायलाच बोलावलं आहे. ऐकतोस ना मग ?'

'हो—'

'मी सिगारेट कां ओढतो —मनाला करमेनासं झालं कीं सिगारेट ही एकच वस्तू मी शोधून काढली आहे कीं त्यामुळें करमणूक होते.' भय्यासाहेब पुढें सांगू लागले. 'दुसरें लग्न करतेवेळीं मला असें वाटायचें कीं बायको शिकलेली असावी आणि निव्वळ पाळणा हालवीत बसणारी असूं नये. चार स्त्री-पुरुषांत वावरणारी असावी. परमेश्वरानें माझी ही कहाणी ऐकली आणि त्याप्रमाणें आतां सांगितल्याप्रमाणें एका वधूच्या गळयांत मी पडलों—' नानाला भय्यासाहेबांना काय सांगावयाचे आहे याचा उमजच होईना. कांहींतरी भ्रमिष्टासारखे ते बडबडत आहेत असें त्याला वाटूं लागलें होतें. कांहींतरी काम काढून येथून निघून जावें असें त्याला वाटूं लागलें. इतक्यांत भय्यासाहेब पुन्हां म्हणाले, 'नाना, ऐकतोस ना ? खरोखर बायको सुंदर होती. बोले कशी मधुर ! बोलण्याचा प्रसंग आठवड्यांतून कधीं कधींच येऊं लागला पुढें पुढें. मी बाहेरून आलों कीं ती कांहीं घरीं दिसायची नाहीं. तेव्हां मला एकदां युक्ति सुचली. गड्याकरवीं एक सिगारेटचें पॅकेट आणविलें. त्यांतली एक सिगारेट ओढली. नाना खोटं नाहीं सांगत तुला. मी मनाशीं म्हटलें बस्स ! बायको नसली तर नसली. आणि तसाच उठलों, तिला सरळ फोन केला.—'आजपासून तूं आणि मी निराळे रहाणार आहोंत' आणखी असंच कांहींतरी—पुढें एकदोन दिवसांनीं माझी बदली या ऑफिसमध्यें झाली. पहिल्या बायकोचा विमा होता तो तिच्या नावानें करून दिला होताच अगोदर; त्यांतले पैसे हप्त्या हप्त्यानें तिला मिळत आहेतच हल्लीं.— ' आतां नानाला वाटूं लागलें कीं त्यांत कांहींतरी रहस्य आहे. त्याला आणखी ऐकावेसें वाटत होतें; परंतु भय्यासाहेब पुढें कांहीं बोलेनातच; सिगारेटचे एकामागून एक चार पांच झुरके त्यांनीं घेतले ! आणि जवळ जवळ सर्व हॉल धूम्रमय करून टाकला. आणि त्या धूम्रवलयाकडे ते पहात राहिले होते.

'हं, मग पुढे ?' नाना म्हणाला.

'कां ? गोष्ट मजेदार वाटली ना तुला ? लोकांचें मनरंजन करते ही गोष्ट. पण ज्या प्राण्यांचा या गोष्टीशीं संबंध आहे त्यांचीं हृदयें मात्र जळावीत नां ?'

या भाषेतील उद्विग्नता आणि उदासीनता नानाला जाणवली. तो आणखी थोडं पुढे सरून धुरांत पहात राहिलेल्या भय्यासाहेबांना म्हणाला, 'माफ करा भय्यासाहेब, असं होत असतांना देखील ही सिगारेटची जळजळीत आग अमर्यादपणें तुमच्या हृदयांत ओतता, भडका होत असेल हृदयाचा.'

'नाना, काट्यानें काटा काढणें हें जसें एक तत्व आहे, तसेंच आगीनें आग विझते असें मला वाटतें. मात्र दोन्हीला आग हें एकच सामान्य नांव आपण दिलें तरी दोन्हीचे परिणाम माझ्यावर भिन्न होत राहिले आहेत.'

'पण—'

'पण काय नाना ? पण काय ? प्रथम प्रथम या धुराच्या चक्राकार गतीकडे पहात असतांना मला किती रम्य कल्पना सुचत–तिच्याविषयीं देखील—म्हणूनच ती नसली तरी तिच्याविषयींच्या रमणीय कल्पना मला आनंदित करीत असल्यामुळें सिगारेट मी जास्त प्रमाणांत ओढूं लागलों. रिकामा वेळ सिगारेट तेव्हांच संपवून टाके. नाना, आतां मात्र मला अगदींच अन्‌इझी वाटूं लागलं आहे. कितीहि सिगारेटस् ओढल्या तरी मनाची रुख रुख–तहान शमत नाहीं आणि या तहानेला शमविण्यास काय पाहिजे आहे हेंहि समजत नाहीं. नाना, डोक्यांत मेंदू आहे किंवा नाहीं कोण जाणें ! कांहीं कामच करीत नाहीं तो. म्हणून तुला ऑफीसमधून तुझ्या कामाची पर्वा न करतां घरीं बोलाविलें. नाना, माझ्याजवळ सतत कोणी तरी माणूस असेल तरच माझी आहे ही स्थिति तरी कायम राहील—'

भय्यासाहेब गप्प बसले. नानाला भय्यासाहेबांच्या या परिस्थितीबद्दल एक नवीनच भीति उत्पन्न झाली. त्यांचें डोकें बिकें फिरून

कांहीं भलतचं होईल कीं काय असें त्याला वाटूं लागलें. त्यांच्या परिस्थितीची खडान् खडा माहिती खुद्द भय्यासाहेबांना विचारणें म्हणजे विनाकारण त्यांना त्रास देणें होतें म्हणून त्यानें या विषयाची माहिती बाहेरून काढण्याचा प्रयत्न करण्याचें ठरविलें आणि तो उठला.

त्याला उठलेले पाहिल्यावर भय्यासाहेब म्हणाले, 'नाना, या पुराणाला कंटाळलास? कंटाळू नकोस. या माझ्या महिन्याच्या रजेंत तुला फावेल त्या वेळेला तू इकडे यावेस असा मी तुला तुझा ऑफिसर म्हणून हुकूम करतो, लक्षांत ठेव.'

'हें काय भय्यासाहेब! मी ऑफीसचें काम शक्य तितके कमी करून तुमच्या सान्निध्यांत जास्त वेळ रहाण्याचा प्रयत्न करीन बरं—जाऊं आतां?'

याप्रमाणें त्यांची परवानगी घेऊन नाना बाहेर पडला. बाहेर पडतां पडतां तो मनाशींच पुटपुटला, 'हा एक प्रवाहपतितच दिसतो!'

---

# २३

सरोजला आपल्या घरीं येऊन आज जवळ जवळ पांच सहा महिने झाले होते. पण या पांच सहा महिन्यांत काकांनी तिला एका शब्दानेंहि तिच्याविषयीं विचारलें नव्हतें. 'आलीस कां? गेलीस कां? आतां काय करणार आहेस? कसा काय तुझा प्रवास झाला? हवा कांहीं चांगली नसावी तेथली?' वगैरेंतून एकादा तरी प्रश्न काकांनीं आपणांस विचारावा अशी तिची अपेक्षा नव्हतीच; पण तिला वाटत होतें, त्यांनीं प्रश्न विचारावा आणि मग आपण त्याचें उत्तर द्यावें. बोलायची संधी मात्र मिळाली पाहिजे. तसें झाल्यास काकांचा राग—काकांचा राग शांत करूंच करूं

पण पहिल्या सारखी त्यांच्या मनांत आस्था उत्पन्न करण्यासहि मग वेळ लागावयाचा नाहीं—पण हा काय मनाचा जुलूम मनावर—कीं दुसऱ्यानें आपली विचारपूस करावी, चौकशी करावी? हा सगळा तिच्या मनाचा पसारा होता. काका मुळींच तिच्याशीं बोलावयास तयार झाले नव्हते.

'त्यांनीं कां म्हणून विचारावे? कसें झालें तरी ते एक वडील माणूस आहेत. आपले वडील आहेत. मानानें, वयानें, बुद्धीनें, कीर्तीनें मोठे आहेत ते आपल्यापेक्षां. कदाचित् त्यांनीं बोलायचे म्हणजे अपमान होणार असेल त्यांचा. आपल्याला बोलायला काय हरकत आहे? मानापमानाची आपल्याला कशाला कदर असायला पाहिजे?—'

'काय होईल कोण जाणे? आपण बोलायला गेलों आणि काका ओरडले आपल्या अंगावर—तर निमूटपणें खालीं मान घालून परतायचं आणि मनाला त्रास आणि शीण करून घ्यायचा—पण असें किती दिवस चालणार? एकदां केव्हांतरी आपलं कांहींतरी व्हायला नको कां? जीवंत रहायचें असेल तर या घरांत कसं रहातां येईल? हें घर आपला संसार नव्हें. आणि संसाराशिवाय माझ्या आयुष्याचें कांहींच कर्तव्य नाहीं. पसंतीची भागीदारी असेल तरच त्या संसाराची उभारणी—

'नाना निमाबरोबर पळून गेला ही बातमी सरलेच्या पत्रात वाचल्यापासून मी एकदम धीट बनलें. कां कोण जाणे—जग एका बाजूला झालें आणि मी दुसऱ्या बाजूला राहिलें तरी देखील सामना देण्याची माझ्या मनाची तयारी झाली; पण त्याचबरोबर मनाला इतकी उदासीनता आली आहे कीं, वाटतें—हा व्याप आणि खटाटोप, प्राण जतन करण्याकरतांच करायचा—आत्म्याची शांति आणि विकास हीं यानें कशी होणार?'

'जगांतल्या बहुतेक गोष्टी व्यवहारानें चालत असाव्यात—व्यवहार म्हणजे खरं तें खोटं आणि खोटं तें खरं—प्रेम तें वैर आणि वैर तें प्रेम—भावनांना दडपून पुढें पाऊल टाकणं हा व्यवहार—भावना उराशीं बाळगल्या कीं, त्या भावना ज्वालामुखी बनतात—आणि मग त्यांत गडप होण्यास किती वेळ लागणार आहे? माझं तसं झालं तर फार चांगलं

होईल. मी एके काळीं नानाला व्यवहार शिकवत होते. आणि आतां मात्र मी भावनेच्या आहारीं गेलें आहे. हें प्रेमाचें व्यसन इतर व्यसनाप्रमाणें मनुष्याच्या नाशापर्यंत टिकतें म्हणायचें!'

'आतां काय त्याचा उपयोग? सरलेनें व्यवहाराचे धड्यावर धडे पत्रांत लिहून धाडले तरी हें व्यसन मला तरी सुटणार नाहीं. आणि उरलेल्या ह्या थोड्या आयुष्यांत मी सोडण्याचा प्रयत्नहि करणार नाहीं. जगाला हा माझा दुराग्रह वाटेल–वाटतोहि–वाटो बिचारा! सरलेनें कधीं कोणावर प्रेम केलें नसेल — तिला बिचारीला काय ठाऊक? प्रेम काय आहे, त्याचें कधीं काय होतें? 'Love some thing one must' हें ॲलिस मेनेलचे अनुभवाचे बोल तिच्यापुरतेच खरे असतील. मी याच्या उलट सांगेन. Love is always dangerous and unable to attend its goal easily and early. लोक हंसतील या माझ्या म्हणण्याला. हसोत. पुढचा जन्म म्हणून जो कांहीं असतो–तो मिळाला तर मी कुणावरहि प्रेम करणार नाहीं.—'

या वेळेस खोलीचें बंद केलेलें दार उघडलें गेलें. आणि मंदा आंत आली. त्याबरोबर सरोजला आपल्या मनाचा पसारा आवरून ठेवावा लागला.

'बरेच दिवसांनीं आलांत–बसा ना त्या खुर्चीवर—' खुर्चीकडे निजल्या निजल्याच बोट दाखवून सरोज म्हणाली.

'तुम्ही आपल्या निजलेल्या आणि मी बसून काय करूं?' बसतां बसतां मंदा म्हणाली. 'हल्लीं बाकी तुम्ही सदा विचारांत असतां नाहीं?'

'मी आल्यापासून तुमची माझी ही दुसरीच भेट. त्याबरनं मी नेहमीं विचारांत असते असें तुम्हाला वाटलें कीं काय?'

'होऽ दोन्ही वेळेला तुम्ही आपल्या विचारांतच गर्क—तो सुद्धां साध्या गोष्टीबद्दल विचार असें नाहीं मला वाटत—कांहीं तरी गूढ गंभीरऽ—'

'आणखी कांहीं?'

'खरं आहेना हें?'

असें म्हणत टेबलावर पडलेला कंगवा हातांत घेऊन त्याचे दाते कर्रर्र वाजवीत मंदा सरोजच्या कॉटवर येऊन बसली.

'स्वास्थ्य असतें आणि त्यामुळें इकडच्या तिकडच्या गोष्टी मनांत येतात. त्यामुळें लोकांना वाटतें मी कसल्या तरी गोष्टींत चूर होऊन गेले आहे म्हणून—'

'अस्सं? खरं बोलायला काय घ्याल?'

'मला पाहिजे तें कोणीहि देऊं शकणार नाहीं. चांगले मित्र–मैत्रिणी म्हणविणारे, दुसऱ्याच्या प्रवृत्तीची कदर न करतां स्वतःचेच विचार दुसऱ्यावर लादण्याचा प्रयत्न अहोरात्र करीत आहेत. तुम्ही तर माझ्या नव्या ओळखीच्या—अपमान समजूं नका हं?'

'छे! माझा अपमान कधींच होत नाहीं. कोणी केला तरी होत नाहीं.'

'हें मला, मी प्रथम मोहनबरोबर तुमच्याकडे आले त्याच वेळेला समजलें; म्हणूनच मी भीड वगैरे सोडून तुमच्याशीं याप्रमाणें बोलूं शकते—मोहन हल्लीं सोलापूरला असतात वाटतं?'

'आतां काय त्यांचा भाव?'

'आणि पूर्वी काय कमी होता?—बरं मासिक कसं काय चाल-लय सध्यां?'

'मी बंद केलं आतां तें मासिक. ज्या दिवशीं त्याचा आपण वाढदिवस केला तोच दिवस त्याच्या पुण्यतिथीला योग्य ठरला!'

'वाढदिवस आणि पुण्यतिथि!' सरोजच्या डोळ्यासमोरून चटकन हीं अक्षरें निघून गेलीं. मंदेच्या घरीं वाढदिवसाला जातांना तिच्या मनांत ही कल्पना आली होती. त्याचीच पुनरावृत्ति आज मंदेनें केली त्यामुळें तिच्या हृदयांत कालवाकालव होऊं लागली. ती स्तब्ध बसली.

'बोलत कां नाहीं तुम्ही?' मंदा म्हणाली. आणि जरा पुढें होऊन तिचा हात तिनें आपल्या हातांत घेतला. 'सरोज—ताप आलाय तुम्हाला?'

‘ झोपेंत भरतो थोडासा ताप. ’

‘ रोज ? ’

‘ रोजच म्हणायचा ! ’

‘ डॉक्टर, दवाखाना, औषध कांहीं ? ’

‘ औषधाच्या ऐवजीं दवा म्हणाला असता तर एका मोठ्या खंडो-गणती काव्य करणाऱ्या कवी मोरोपंताचं तरी अनुकरण केल्यासारखं झालं असतं. ’

‘ थट्टेचा विषय नाहीं हा ! ’

‘ केव्हां नव्हे ? अतिपरिचयांत अवज्ञा–नित्याच्या गोष्टीबद्दल त्यांचें कौतुक कोण करील आणि करवून घेईल ? ’

‘ या बोलण्यांत काय अर्थ ? ’

‘ शरद् ऋतूंतल्या मेघासारखें नाहीं मी बोलत. प्रत्यक्ष कृति तुम्हाला दिसत आहेच. ’

‘ आतां माझं मासिक बंद झालं आहे हें तुम्ही विसरला वाटतं ? नाहींतर एवढं वाङ्मय बोलण्यांत बाहेर पडलं नसतं. बरं जाऊं दे तें. मी सांगतेच तुमच्या काकूला कीं तुम्हांला ताप आलाय म्हणून. ’

‘ काय मिळेल तुम्हाला त्यांत ? ’

‘ औषधोपचार होतील तुम्हाला ! ’

‘ आणि मग मी अगदीं अमर होईन–मला जगणं नको झालं आहे मंदाताई-आत्महत्या करून जगाला मनोदौर्बल्य दाखवावयाचें नाहीं इत-केंच. फार लवकर मरावं असं मला नेहमीं नेहमीं वाटतं– पण—’

‘ भलतंच काय बोलत आहात तुम्ही ? ’

‘ भलतं ? हें नाहीं भलतं–येतांना कसला अल्बम बरोबर आणला होतात तो नाहीं मला दाखविलात ? ’

‘ तुम्हाला दाखविण्याकरताच आणला होता; पण तुम्ही ह्या आशा–ओहोहो, तुम्ही विषय बदलायला लागलांत कीं ! हं सांगा–व्यवस्थित-पणें ट्रीटमेंट घेणार आहात कां, तर दाखविते.–मोहनच्या हॉस्पिटलमधील फोटो आहेत ते. ’

'बरं बरं!'

'बरं बरं नव्हे खरं खरं सांगा.'

'हो, अगदीं खरं.'

तिनें टेबलावर ठेवलेला अल्बम तिच्या हातांत दिला. सरोज तो अल्बम पाहूं लागली, इतक्यांत काकू खोलींत शिरल्या.

'अग, आज किती वेळ निजायचं सरोज?' त्या म्हणाल्या. त्यांची दृष्टि मंदेवर जातांच त्यांच्या कपाळावर रेषा उमटल्याच. परंतु सरोजच्या इतका वेळ निजण्यामुळेंच त्या पडल्या असाव्यात असें मंदेला वाटणें सहाजिक होतें. सरोजला मात्र समजलें तिच्या काकूच्या कपाळाला कां आठ्या पडल्या तें. काकूंची कल्पना 'मंदा म्हणजे नवऱ्यानें टाकलेली एक नगरभवानी!' त्यामुळें तिच्याविषयीं काकूंचें मन शुद्ध नव्हतेंच. यावेळीं काकूंनीं वरील अभिनयापेक्षां ज्यास्ती तिरस्कार दाखविला नाहीं आणि सरोजनेंहि दाखविला गेलेला तिरस्कार तिला समजल्याचें भासविलें नाहीं.

काकूच्या प्रश्नाला उत्तर म्हणून, 'ह्या आल्या म्हणून बसले जरा यांच्याशीं बोलत' असें म्हणून ती अल्बम पाहूं लागली. काकू चहा करण्याकरतां निघून गेल्या.

अल्बममधील बहुतेक फोटो हॉस्पिटलमधील होते. आणि त्यांतले पुष्कळसें कांहीं तरी काम करीत असतांना घेतलेले होते. त्यामुळें डॉ० मोहनचा किंवा त्या फोटोंत असणाऱ्या कोणाहि व्यक्तीचा स्पष्ट ठसा उमटलेला नव्हताच; परंतु त्यांत एक दोन असेहि फोटो निघाले होते कीं त्यामध्यें व्यक्तीचे स्पष्ट ठसे उमटलेले होते.

इतर सर्व फोटो पहात असतांना सरोजला जो संशय आला होता तो हे फोटो पाहून नाहींसा झाला होता त्यापैकीं एक स्पष्ट फोटो दाखवीत ती म्हणाली, 'ही मुलगी माझ्या ओळखीची आहे.'

'शक्य नाहीं—' मंदा म्हणाली. 'नुकतेच कुठं चार महिने झाले ती हॉस्पिटलमध्यें आली.'

'नांव सांगूं तिचं मी? निर्मला आहे तिचं नांव.'

' तुमच्या कशी हो ती ओळखीची? बाकी मुलगी मोठी गोड बरकां! मोहन तिला नेहमीं शाबासकी देतात.'

' ती कोठून आली तुम्हाला माहिती आहे का?'

' छे! मला नाहीं माहिती. मला कसं माहिती होणार? मी फक्त दोन दिवस सोलापुरास होते. आणि तेवढ्यांत एकदा हॉस्पिटलमध्यें गेले होते. तिथें ती भेटली. डॉक्टरांच्याबरोबर मला पाहिल्यावर तीहूनच माझ्याशीं चार शब्द बोलली. त्यांत मी काय विचारणार तिला आणि ती काय सागणार?'

' तुम्ही माझं एक अचानकपणें काम केलंत अं ऽ—'

' खरं–आणि खरोखरच मी हा अल्बम तुम्हाला मुद्दाम दाखवा यला आणला होता. कारण मोहनची तुमची ओळख आहे हें मला माहीत होतं—आतां मात्र तुम्ही तुमच्या प्रकृतीची काळजी घेतली पाहिजे हं-तुम्ही नुसतीं चित्रंच नाहीं पाहिलीं, त्याबरोबर तुमचें कामहि झालें—मी विचारीत नाहीं म्हणा तुम्हाला त्यांत तुमच्या कामाचें काय सांपडलें तें. तुम्हाला ज्या वेळेस परमेश्वर बुद्धि देईल सांगण्याची, त्या वेळेला सांगा.—जाऊं आतां मी?'

' वा—चहा घेतल्याशिवाय कशा जाल!'

' चहाचं कसलं काढलंत तुम्ही या वेळेला?'

' विनय पुरे हं— तुम्ही चहा घेतलाच पाहिजे.'

' मग तुम्ही कधीं याल माझ्या घरीं?'

' कां उसनं लगेच फेडायचा विचार आला वाटतं एकदम मनांत?'

' तसं म्हणालात तरी चालेल—हं अगोदर बोला केव्हां याल त्या?'

' येण्याचा प्रयत्न करीन. मला येववायचं नाहीं. तुम्हीच रोज येत गेलात तर मला खरोखर बर वाटेल.'

इतक्यांत चहा पिण्याकरतां काकूंनीं सरोजला घरांत हाक मारली. सरोज आंत उठून गेली आणि चहाचे दोन कप आपल्या खोलींत घेऊन आली.

चहा पितां पितां सरोज म्हणाली, ' मंदाताई, तुम्ही येत जा कधीं

कधीं— मी आहे तोंपर्यंत याल ना? मला अगदीं करमत नाहीं. बाहेर जावसं वाटत नाहीं, कोणी माझ्याकडं यावसं वाटत नाहीं. तुम्ही मात्र येत जा अं—'

'येईन कीं,—'

चहा पिऊन झाल्यावर मंदा जावयास निघाली. तिला थोडीशी सुपारी देऊन सरोजनें पुन्हा मंदेला तिच्याकडे येत जाण्याबद्दल बजावलें, आणि ती परत आपल्या पलंगावर येऊन पडली. त्यावेळीं तिच्या तोंडून सहजच एक काव्यचरण बाहेर पडला.

दूर दूर किती तरी। एक तारका परी।

---

# २४

नाना निर्मलेचें पत्र वाचीत बसला होता. वाचतांना त्याची चर्या द्विधा झाल्यासारखी झाली होती. पत्र वाचावें असें तर त्याला मनापासून वाटत होतें. गिरींच्या कारागृहवासांतले दिवस संपल्यानंतर निर्मलेच्या आयुष्यांत झालेले फरक—तिनें मिळविलेलें बौद्धिक आणि जागतिक ज्ञान, त्याच पत्रांत पूर्णपणें भरलें आहे असें त्याला वाटत होतें. मातेच्या उदरांतून बाहेर पडलेलें सचेतन मूल आपलें अस्तित्व दाखवितेंच— कोळशाच्या खाणींत कां असेना—वरील थर किंचित् बाजूला झाल्यावर हिरा आपलीं तेजःपुंज किरणें लोकांच्या डोळ्यांत फेकतोंच. निर्मलेचें तसेंच झालें होतें. स्वाभाविकतेला थोडासा पुढें येण्याला अवसर मिळतांच—तिचा मानसिक विकास झाला, आणि ती एक योग्य अशी स्त्री बनली, याची त्याला त्या पत्रानेंच खात्री पटली. पत्र लिहिण्याची तिची पद्धत एकाद्या

मासलेवाईक लेखकाचा हात धरणारी नव्हती, तरी तिनें लिहिलेला मजकूर वाचून त्याला आनंद होत होता. उदा० ‘ नाना ! मी होते कोण, आणि झाले कोण ! माझ्यांतला हा आमूलाग्र बदल — तूंच याला जबाबदार आहेस. वास्तविक तूं माझा कोण—पण—काय लिहूं मी तुझ्या-बद्दल—आतांपर्यंत तुझीं येत असलेलीं पत्रें वाचून मी आपल्या मनाचें समाधान करून घेत असे; परंतु हल्लीं असें वाटायला लागलें आहे कीं, एकदां तूं यावेस आणि मला भेटून जावेस—केव्हां येशील ? ’

या मजकुराच्या वरखालीं कांहीं नाहींच लिहिलेलें अशी त्यांची भावना झाली होती कीं काय कोण जाणें. दृष्टि जणूं खिळून बसली होती या एवढ्या मजकुरावर. पत्रांत इतकें तादात्म्य पावून सुद्धां त्याचें हृदय धडधडत होतें. आगांतुक विचारांच्या लहरीवर लहरी येत होत्या कीं काय कोण जाणें !

इतक्यांत निर्मला त्याच्या खोलींत शिरली—

‘ या डॉक्टरीणबाई— तो एकदम म्हणून गेला.

‘ हॉ—हॉ— चिडवूं नकोस गडे— साधी नर्स नाहीं झालें तर म्हणे डॉक्टरीणबाई–’ असें म्हणतां म्हणतांच ती त्याच्या डाव्या खांद्याच्या जवळ येऊन त्याच्या हातांतील पत्र पाहूं लागली. ‘ ओळखूं हें कोणाचें अक्षर आहे तें—’ उत्तराची वाट न पहातांच ‘ निर्मलेचं!’ ती उद्गारली.

‘ निर्मल, किती सुंदर लिहितेस गं तूं ! ’

‘ पुरे पुरे, नाना दृष्ट लागेल हो मला ! ’

‘ अरे वा ! सुंदर बोलायला पण शिकलीस कीं ! ’

‘ बघ हं, माझी चेष्टा करायची नाहीं. ! ’

‘ तर–तुझी चेष्टा नाहीं करायची म्हणे. मोठी डॉक्टरीणच लागून गेलीस किनई ! ’ नंतर तिला धरून पुढच्या खुर्चीवर बसवीत असतांना त्यानें विचारलें, ‘ आज दवाखान्यांत उशीरसा लागला ! ’

‘ छे ! मी बसत नाहीं कांहीं ! मला पुष्कळ काम आहे. आज दवाखान्यांत एका नर्सचा पाय मुरगळला हो !—’

‘ अगदीं एखाद्या ऑफिसरच्यावरती ताण मारायला लागलीस कीं, बस ! अशी बसून सांग—’

' सांगते ना, चहा करतां करतां सांगते—डबा यायला अजून अवकाश आहे. थोडा थोडा चहा घेऊ ना आपण.' असें म्हणून ती स्टोव्ह पेटविण्यास उठली.

' पण हो नाना—कलकत्त्याला माझं पत्र मनापासून वाचायला वेळ झाला नाहीं वाटतं तुला—म्हणून इथं आल्यावर त्यांत पुन्हा डोकं खुपसून बसलास—'

' पहातोना—पत्रांत लिहिल्याप्रमाणें निर्मला खरीच सुधारली कीं नाहीं तें!'

' मग काय वाटलं तुला—खात्री झाली कीं नाहीं?'

' छे बुवा, निर्मला—तुझ्यावरनं दृष्टि काढूं नये असं वाटायला लागलं आहे अगदीं—खरोखरच तुला दृष्ट लागेल. मला कल्पना नव्हती—निर्मल—त्या निर्मल नदीकाठचा प्रसंग—आणि तुला एकटीला या डॉक्टरांच्या भरंवशावर टाकून जाताना माझ्या अंतर्मनाच्या झालेल्या स्थितीचा प्रसंग डोळ्यासमोर उभा राहिला म्हणजे—कांहीं वेळेला वाटतें कीं, ज्या गोष्टी होतात त्या बऱ्याकरतांच—यांतूनच कांहीं वाईट निष्पन्न झालं असतं तर माझ्या मनाला इतकं लागलं असतं—कदाचित्—'

' पुरे पुरे-आता चहा प्राशन झाल्यावर अं-राहूं दे थोडं शिल्लक-तुझे ते मित्र कुठं गेले? फारच उदासीन दिसतात ते! काय होतं माणसांना कोण जाणें? आणि असलं शुष्ककाष्ठ बरोबर आणण्यांत काय मौज आहे कोण जाणे?"

' निर्मल—ते माझे साहेब आहेत. गुणी आहे बिचारा—'

' भय्यासाहेब—भय्यासाहेब लिहीत होतास ते तेच कां!'

' त्यांचं मन इतकं कोवळं आहे आणि शुद्ध आहे कीं—'

' म्हणूनच बायकोला टाकून दिलीन् ना!'

' तुला काय माहिती!'

जी माहिती मिळविण्याकरतां नाना कलकत्त्यास असतांना झटत होता, ती माहिती निर्मलेकडून कळणार असें त्याला वाटूं लागलें. म्हणून त्यानें ती माहिती निर्मलेकडून पुरेपूर मिळविण्याचें ठरविलें.

त्यानें पुन्हा विचारिले, ‘ तुला कशी माहिती झाली ही बातमी ? ’

‘ त्यांची बायको आमच्या डॉक्टरांची दोस्त आहे—’

‘ त्यांची बायको तुझ्या डॉक्टराची दोस्त आहे ? ’ त्यानें एक आश्चर्याचा सुस्कारा सोडला. ‘ भय्यासाहेबांची बायको मोहनची मैत्रीण ! ’ तो पुटपुटला.

‘ नाना ! इतकं आश्चर्य आणि दुःख होण्याचं काय कारण—’

‘ काय कारण म्हणून विचारतेस ? बरं कारणं नंतर सांगेन. मला एकदां ती सगळी हकीगत सांग. ’

‘मला तरी ज्यास्त काय माहीत असणार-तिच्या नवऱ्याचे म्हणजे भय्यासाहेबांचे पैसे विमा कंपनींतून येतात. ती त्यांतल्या एका पैशालासुद्धां शिवत नाहीं. ते पैसे ती आमच्या दवाखान्याला देऊन टाकते झालं. ’

‘ आणि चरितार्थ ? ’

‘ मास्तरीण झाली आहे आतां धवलपूरला—मला आठवतय धवलपूर—नाना—तुला आठवत असेल कीं ! ’

‘ असं काय ? छे बुवा, बायका म्हणजे काय पदार्थ आहे—अगम्य आहे यांत संशय नाहीं. तो बिचारा तळमळतोय तिच्याकरितां —’

‘ आणि तिला बरं वाटत असेल अगदीं—’

‘ त्या बिचाऱ्याच्या जीवाला सुख नाहीं.-’ नानाचा चेहरा उद्विग्न झाला होता. एकप्रकारचा रखरखीतपणा आला होता त्याच्या चर्येवर. त्याचे वरील वाक्य पूर्ण होतें न होतें इतक्यांत डॉ. मोहनची स्वारी खोलींत शिरली. त्यांना नानानें कशीबशी आपल्या शेजारींच बसण्यास जागा दिली. डॉक्टर अशावेळीं निर्मलेच्या घरीं कधीं आलेच नव्हते.

‘ डॉक्टर, आज या वेळीं ? ’ ती म्हणाली.

‘ हो, भय्यासाहेब आल्याचं कळलं. त्यांना भेटायचं आहे जरा. तुम्ही काय चहा करतां वाटतं ? मीहि घेईन हं जरा. आणि नाना कांहीं बोलत नाहींत—भांडलांत काय तुम्ही त्यांच्याशीं ? ’

‘ छे !—मी त्यांच्याशीं भांडेन होय ? डॉक्टर तुम्ही अशी कल्पनासुद्धां करीत जाऊं नका. ’

'बरं राहिलं. भय्यासाहेब कुठें आहेत नाना ?' मोहन म्हणाला.

'डॉ. मोहनच्या दवाखान्यांत ही निर्मला नर्स आहे असें मी सहज सांगून गेलों. याचा परिणाम म्हणजे भय्यासाहेब न सांगता बाहेर निघून गेले हें मी आतां उमगलों.'

'अस्स अस्स—' निर्मला व मोहन एकदमच म्हणाले.

'वा छान—'

'तसं नव्हे तें—बरोबरच आहे! पण मला त्यांची गांठ घेतलीच पाहिजे. नाना तें कुठं भेटूं शकतील ?

'मी आतां कसं सांगू शकेन तें ?' तो पुढें म्हणाला, 'त्यांच्या नेहमींच्या जाण्यायेण्याच्या जागा दीड दिवसांत मला कळणं असंभवनीय आहे.'

'तें बरोबर आहे. पण मी आठवड्यांतून दोन दिवस धवलपूरच्या हॉस्पिटलमध्यें जात असतो. आज निघणार आहे त्यापूर्वी त्यांची माझी गांठ पडली असती तर बरं झालं असतं. मंदाला भेटतच असतो तिकडे गेल्यावर. त्यांना विचारून तिला इकडे घेऊन आलों असतों. बरं पुन्हां मी एकदां येऊन जाईन. पडली त्यावेळीं गांठ तर ठीकच नाहींतर—तुमच्याशीं पण मला यांच्या बाबतींत वगैरे बोलावयाचें आहे. बरं जातो मी—'

'डॉक्टर, चहा घेणार आहात ना ?'

'अरे हो खरंच—हं द्या.'

डॉक्टर चटकन् चहा पिऊन बाहेर पडले. त्यांच्या मागोमाग नानाहि भय्यासाहेबांना पहाण्याकरितां बाहेर गेला. तोंच खाणावळींतला डबा येऊन उतरला; परंतु निर्मलेनें तो डबा तसाच ठेवला आणि ती पाहुण्यांची वाट पहात बसली.

---

# २५

मंदा आज पुन्हा सरोजकडे येऊन बसली होती. सरोज किंचित् सुधारल्याचें तिच्या लक्षांत आलें. रांगोळीची वाटी, एक लहानशी सहाण आणि कापसाचा पुंजका इतकें साहित्य जवळ घेऊन काकूहि शेजारींच वातीकरतां कापूस निवडीत बसल्या होत्या. मंदेविषयींचा ग्रह काकूंनीं बदलून घेतला होता. आणि उलट त्या तिच्याशीं अगदीं ममतेनें वागूं लागल्या होत्या. कारण जसजशी मंदा त्यांच्या घरीं येऊं लागली होती, तसतसा सरोजचा उत्साह वाढत होता हें काकूंच्या लक्षांत आलें होतें. त्यामुळें 'मंदा कोणी कां असेना, कशी कां असेना, कांहीं का करेना, आपल्या पोरीच्या मनरंजनांत भर घालून तिची करमणूक करते आहे ना— मग काय करायचय आपल्याला बाकीच्या गोष्टीशीं?' हा त्यांचा पोक्त आपमतलबी विचार त्यांच्या वागण्याच्या बुडाशीं होता. मंदेलाहि त्यामुळें तिच्याकडे येण्यास बिलकूल संकोच वाटत नव्हता. कांहीं काम उद्योग नसला कीं, ती सरोजकडे येऊन बसे. तिला मोहनची हकीगत सांगे, त्याच बातमींत ती ज्यास्त रमते, असें तिला आढळून आलें होतें. अर्थात् तिकडील हकीगत सांगतांना निर्मलेचा उल्लेखहि तिच्या भाषणांत होत होता. मात्र निर्मला कोण, कोठून आली, कोणी आणली, तिचा एकंदर इतिहास काय वगैरेबद्दल मंदासुद्धां माहीतगार नसल्यामुळें त्या बाबतींत ती तिची जिज्ञासा पुरवूं शकली नाहीं. पण ती जें कांहीं सांगे तें मात्र सरोजला पुष्कळच उद्‌बोधक वाटे. उदा० निर्मलेची वागण्याची पद्धत, तिचा मनमिळाऊपणा, आज्ञाधारकपणा, शांतपणा, सभ्यपणा इ०—तसेंच तिच्या बुद्धीचें वर्णन करतांना ती सांगे कीं, 'एखाद्या परीक्षा पास झालेल्या नर्सच्या अंगांत जे नर्सिंगचे गुण नसतात ते गुण तिनें अवघ्या चार महिन्यांच्या अवधींत डॉ. मोहन यांच्या सान्निध्यांत मिळविले आणि ती एक योग्य नर्स झाली. डॉ. मोहनांची तिच्यावर

अतिशय श्रद्धा आहे. ते कोठें परगांवीं जायचे झाले तर हल्लीं त्यांच्या मागें, त्यांनीं सांगितल्याप्रमाणें सर्व काम ती चोख करते.' अशा तऱ्हेचें तिचें वर्णन तिला ऐकावयास मिळे, त्यामुळें तिला या निर्मलेबद्दल अति सहानुभूति वाटे, आदर वाटे, प्रेम वाटे; पण एक दुसरीच चिंता तिनें आपल्या मनाला लावून घेतली होती. ही निर्मला म्हणजे आपण प्रथम जिचा फोटो पाहिला ती कीं अमिराबादची निर्मला ती, कीं ही आणखी कोणी निराळीच निर्मला आहे—तिला हेंच समजावयाला पाहिजे होते. पण मंदेकडून तें तिला कळेना.

म्हणून आज मुद्दाम तिनें तिला विचारलें, 'मंदाताई–तिला कोणी हो मोहनच्या स्वाधीन केली ? खरोखर चांगली असावी नाहीं ती. मला एकदां भेटावी असें वाटतें, पण कशी भेटणार ?'

'भेट न व्हायला काय झालं–होईल कीं, मीसुद्धां कितीदां आपलं विनोदानें मोहनला तिच्या आगमनाबद्दल विचारलं असेल पण तो कांहीं सांगत नाहीं. त्यांनीं म्हणें कुणालास वचन दिलं आहे, तिच्याविषयीं माहिती विचारायची नाहीं आणि तिला येथें कोणी आणलें तेंहि सांगावयाचे नाहीं, म्हणून.'

'बरं जाऊं दे–तिला एकदां मला भेटवाल कां ? मला अशा कर्तव्य–दक्ष मुली फार आवडतात.'

'विचारीन आज मोहनला. आज त्याच्या दवाखान्यांतला वार आहेच. येईलहि तो. बरं मी जाऊं कां ?'

'लवकर चाललांत आज अगदीं ?'

'तो येईल ना घरीं—'

'येऊ दे ना. इकडे येतील ते. त्यांना हें घर माहीत आहे. आणि तुम्ही सांगून ठेवायला हरकत नाहीं कीं, मी घरीं आणि शाळेंत नसल्यास या घरीं आहेच म्हणून.'

'तसं मी सांगून ठेवलं आहेच; पण आतां काय काम आहे ? तो आला असेल घरीं—'

'मग तर तुम्ही जाणें चुकीचें ठरेल; कारण तुम्ही घरीं जाऊ

अन् ते तुम्हाला शोधीत बसतील; त्यापेक्षां तुम्ही येथें बसलात् तर ज्यास्त बरं होईल.'

मंदा कशीबशी कबूल झाली. नंतर इकडच्या तिकडच्या थोड्या गप्पा झाल्यावर बुटाच्या पदक्षेपाचे ध्वनी त्यांच्या कानावर आले. आणि मागोमागच मोहनची मूर्ति त्या खोलीच्या दारावर टक् टक् नाद करती झाली. मंदेनें कोण आलें तें ताडलें होतेंच, म्हणून कोण आहे म्हणन न विचारतांच किंवा पाहतांच ती त्याला आंत बोलावूं शकली. इतका वेळ गप्प असलेल्या काकू आतां थोड्याशा बोलण्याच्या बेतांत आल्याच आणि 'अगबाई ! हा मोहन कां ? बराच मोठा झालास कीं—'

'नाहीं काकू–' मोहन खुर्चीवर बसत बसत म्हणाला. 'सूट घातला म्हणजे माणूस मोठा दिसतो–आई म्हणते ना नेहमीं–सुटाबुटांत हिंडायला लागलास म्हणजे कांहीं मोठा नाहीं झालास.'

'अस्सं कां ! येथून सोलापूरला बिऱ्हाड नेल्यापासून कांहीं भेटला नाहींस.'

'प्रसंगच नाहीं आला काकू—आज मंदाबाई इकडे येऊन बसल्या म्हणून आलों.'

'बरं, सरलेचं कांहीं पत्र बित्र ?'

'ठीक आहेत सगळी मंडळी.'

'तिला कांही मूलबाळ ?'

'नाहीं अजून कांहीं. परवा त्यांच्या शाळेचे एक प्रतिष्ठित आश्रयदाते हृदय—विकारानें वारले.'

'आम्हांला काय कळायला मार्ग—मला वाचायचा कंटाळा. ही सरोज पण अलिकडे कांहीं वाचून दाखवीत नाहीं.'

'हं ऽ अं ऽ' तो उगीचच हंसला.

'आई कधीं इकडे येते कां नाहीं ? आली तर सांग तिला माझा निरोप—या म्हणावं कीं एकदां.'

'बरं जरूर.'

'चहा घेतोस ना ?'

'घेतो कीं.'

'मी केलेला आवडेल कां?'

'पण आतांच चहा घेऊन आलों आहे.

'नाहीं, मी नाहीं चहा करणार—कंटाळा आला आहे मला. तिलाच सांगणार आहे! सरोज, जा बरं दोन तीन कप चहा कर—लग्नाचं जमवलंस कां नाहीं अजून?' सरोज अजून तेथेंच असलेली पाहून काकू पुन्हा म्हणाल्या, 'चहा करतेस ना?'

ती उठून गेली. मोहनला वाटलें कीं काकूंना इतकें बोलावयाचें स्फुरण कसें आलें. आता त्याला उमगलें कीं याचें मूळ म्हणजे त्याचें लग्न. काकूंनीं त्याच्याशीं बोलावयाचें एवढें धारिष्ट (!) पूर्वीं दाखविलें नव्हतेंच. काकू पुढें बोलूं लागल्या, 'मोहन, आतांशा आमचा नाना कुठें असतो कांहीं माहिती आहे कां तुला?'

इतक्यात चहाचा ट्रे घेऊन सरोज त्या खोलींत आली.

'हो, तो हल्लीं सोलापूरलाच असतो. दोन दिवस झाले. जाणार आहे पुन्हा कलकत्त्याला लवकरच.'

तो म्हणजे कोण याचा सरोजला अजून बोध झाला नव्हता. तिनें सगळ्याना चहा वगैरे दिला. आणि काकूंना काकांची कॉफी तयार असल्याचें सांगितलें.

'सोलापूरला काय आहे?' काकू म्हणाल्या.

'आलाय आपला सहज!'

'कोण पण?' सरोजनें विचारिलें.

'नाना—'

'सोलापूरला आलाय?—'

'हो—भय्यासाहेब आणि तो दोघे आलेत. कलकत्त्याला असतात ते दोघे हल्लीं.' यावेळीं मोहननें मुद्दाम मंदेकडे पाहिलें.

'खरंच आलेत भय्यासाहेब?' मंदेनें कुतूहलानें विचारलें.

'चेष्टा करीत नाहीं मी मंदा—पण फारच बुवा week minded झालेत. अशक्तता आलीय—मी त्या दोघांना स्टेशनवरून निर्मलेच्या

घराकडे जातांना टांग्यांत पाहिलें. आणि मुद्दाम त्यांना भेटण्याकरतां निर्मलेच्या घरीं गेलों. तर म्हणे, मोहनच्या दवाखान्यांत नर्स असलेल्या निर्मलेकडे नाना उतरला असल्यामुळें ते न सांगतांच बाहेर पडले. लवकर आले नाहींत. माझी गांठ पडली नाहीं. माझं नांव ऐकावयाला जो गृहस्थ तयार नाहीं तो मला भेटणार कसा—आणि मी त्याच्याशीं काय बोलूं—काम मोठं कठीण दिसतं,—तूं म्हणतेस मंदा, कीं त्यांना सांग कांहीं तरी. आतां तूं आपली समक्षच गांठ घे म्हणजे झालं. चल, येतेस सोलापूरला?'

यापूर्वीच काकू तेथून हालल्या होत्या. त्यांनीं काकांना वर कॉफी नेऊन दिली आणि हें सर्व वर्तमान त्यांना निवेदन केलें. त्यावेळीं ते खालीं आले. आणि खोलीच्या दारांत पाऊल पडण्यापूर्वीच—त्यांना ऐकूं आलें. 'मोहन -'

अगदीं हताशतेनें आणि केविलवाणेपणानें हा शब्द उच्चारला गेला असल्यामुळें काका जरा थबकून बाजूला झाले.

'मोहन, अमिराबादला तुमच्याकडून असंच कायसं काम करून घेण्याचा माझ्यावर प्रसंग आला होता. त्यावेळीं तुम्ही—जाऊदे तें— मोहन आतां तरी एक काम कराल कां माझं—मोहन, हो म्हणा— यावेळीं नाहीं म्हणूं नका—मंदाताई— तुम्ही तरी हो म्हणा—जाणार आहांत ना तुम्ही?'

'सरोज, इतकं गयावया करण्याचं कांहींच कारण नाहीं. मी जोपर्यंत नाहीं म्हटलं नाहीं तोपर्यंत तुम्हाला 'हो' समजायला कांहींच हरकत नाहीं.— '

आणि त्याच वेळेला काकांनीं आंत प्रवेश केला. त्यामुळें त्यांचें बोलणें तसेंच राहिलें. त्या सर्वांनीं काकांचें औपचारिक स्वागत केल्यावर काकांनीं त्यांना बसावयास सांगितलें. आणि मोहनला नानाला एक पत्र देत असल्याचें सांगून तोपर्यंत त्याला थांबण्यास सवड असल्याचें स्वतः समजून घेतलें.

काकांनीं लिहिण्यास सुरवात केली ती सरोजच्या खोलींत बसूनच.

त्यामुळें त्या कोणाला कोणाशींहि कांहींच बोलतां येईना. एकमेकांच्या तोंडाकडे पहाण्याशिवाय त्यांना कांहीं करताहि येत नव्हतें.

मोहननें प्रथम मंदेकडे पाहिलें. मोहननें केलेलें भय्यासाहेबांचें वर्णन तिला अगदीं भेसूर वाटूं लागलें होतें. कां, कोण जाणें तिच्या अंगावर काटा येऊन, तिचे स्पष्टपणें थरारलेलें अंग मोहनच्या नजरेस आलें. अर्थात् ही तिच्या शरिराची चालना मोहनला कांहीं तर्क बांधण्यास पुरेशी होती. त्याला वाटलें कीं, 'तिनें भय्यासाहेबांचें दुराग्रही, दुर्व्यसनी, दुर्बल, असें एक चित्र मनांत रंगविलें असून, अशा माणसाच्या सान्निध्यांत आपण जायचें काय? त्यांची पुन्हा मैत्री आणि प्रेम संपादण्याचा प्रयत्न करून एकत्र रहावयाचें काय?' शिवाय तोंडी घटस्फोटानंतर तिच्या एकंदर वागणुकीचें मोहननें बारकाईनें निरीक्षण केलें, त्यांत मोहनला असें आढळून आलें होतें कीं, मंदा भय्यासाहेबांच्याबद्दल अतिशय व्याकूळ झाली आहे आणि ते भेटतील केव्हां असें तिला होऊन गेलें आहे. आणि तोच भाव तिच्या संमिश्र भावनासंमर्दांत प्रतीत होत होता. 'जीवाला त्रासलेला—ज्याच्या आयुष्यांत कांहीं उणीव आहे असें वाटून घेणारा मनुष्य प्रसंगीं व्यसनी आणि दुर्बल बनतो. आणि भय्यासाहेब तसेंच बनले असले तर—पण याला जबाबदार मीच—रुचत असलेलें पचतेंच असें नाहीं. मी मला रुचत असलेली गोष्ट चाखत बसले त्यामुळें भय्यासाहेबांच्या सहवाससुखाला आंचवले आणि मीही त्यांना दुरावले.—'

पण आतां काय?—मनांतील या प्रश्नार्थक लहरीबरोबर तिची मान किंचित् उंचावली गेली आणि तिच्या सजल नेत्रांवरील पापण्या वर होऊन त्या प्रश्नाच्या उत्तरासाठींच कीं काय तिनें मोहनकडे पाहिले. त्याच वेळेला मोहननें आपली दृष्टि काढून सरोजकडे वळविली होती.

सरोज—मोहनच्या दवाखान्यांतील निर्मलेचे फोटो पहात असतांना तिनें आशा-ज्योत पेटविली होती. ती आतांपर्यंत कशीतरी सुरळीतपणें तेवत राहिली होती. परंतु 'निर्मलेच्या घरीं नाना उतरला' हेंच जणूं ज्योतीवर आच्छादण्यासाठीं झांकण, मोहन बरोबर घेऊन आला आणि त्यांनीं

तें टाकलेंहि. अर्थात् त्यामुळें ती आशा–ज्योत आतां किती वेळ टिकेल हें सांगावयाची जरूरी नाहींच. आच्छादनाच्या आंत जोपर्यंत जीवन-वायू आहे तोपर्यंतच ती टिकेल.

तिचा मुखडा फिक्का पडत चालला—आतां किंवा क्षणानें तिला कदाचित् मूर्छा येईल असें वाटत होतें. आशा–ज्योतीचें शीर्षक वाती पर्यंत येऊन ठेपलें होतें.—

इतक्यांत काकांचें पत्र लिहून झालें आणि त्यांनीं मोहनजवळ पत्र देतां देतां सांगितलें, 'मोहन—तुम्ही तोंडींहि सांगा कीं, काकांना तुझ्याशीं कांहीं महत्त्वाच्या कामांत बोलावयाचें आहे—मी पत्रांत लिहि-लेंच आहे—पण सांगा तुम्ही—'

ज्योतीवरचें आच्छादन त्या शेवटच्या स्थितींत जरी काढलें आणि तिला प्राणवायू मिळाला तरी ती पुन्हा आपलें तेवन–कार्य सुरू करते.

नानाला काकांनीं भेटायला अन् बोलायला बोलाविलें हें ऐकल्या-नंतर सरोजच्या फिक्या चेहऱ्यावर बारीक पापुद्र्याप्रमाणें रक्तवर्ण पसरूं लागल्याचें ज्यावेळीं मोहनच्या नजरेस आलें त्यावेळीं सरोजच्या एकंदर मनःस्थितीची मोहननें वरीलप्रमाणें कल्पना केली असल्यास त्यांत नवल नाहीं.

पुन्हा काकांनीं मोहनच्या कानांत कायसेंसें सांगितलेंच. सरोजला ऐकूं आलें तें इतकेंच.–'विचार करा आणि आठ दिवसांनीं सांगा मला.' असें म्हणून जाण्यास निघालेल्या मोहनला दादाकाका दरवाज्यांत पोंचविण्यास गेले. मंदाहि सरोजला विचारून मागोमाग बाहेर पडली.

# २६

'आज एका गोष्टीचा खुलासा करण्याकरितां म्हणून मुद्दाम तुला बोलाविलें आहे.' नानानें काकांच्या दिवाणखान्यांत प्रवेश करतांच त्याला बसावयास सांगून काकांनीं बोलण्यास सुरवात केली. अर्थात् नानाला त्यांतील कांहींच उमगेना. वास्तविक कलकत्त्याहून येताना गाडींत एका गृहस्थाकडून काकांसंबंधीं जी माहिती त्याला मिळाली होती, त्यामुळें तो त्यांचें तोंडहि पहाण्यास तयार नव्हता; पण मोहननें बराच आग्रह केल्यामुळें नाना काकांना भेटण्यासाठीं सोलापुराहून धवलपुरास आला होता. काकांचें पहिलेंच वाक्य अगदीं गूढ व संदिग्ध असल्या. मुळें तो थक्कच झाला! त्याचें विचारचक्र सुरू झालें—'ही स्वारी कसला खुलासा करणार आहे? माझ्या आयुष्याशीं संबंध आहे कां त्याचा? छे—छे—माझं आयुष्य इतकं रहस्यमय असेल असं नाहीं मला वाटत—मग—' पण यापुढें काकांनीं त्याला विचार करण्यास सवडच दिली नाहीं.

ते पुढें म्हणाले—'तूं येथें असतांना ज्या वेळेस दृष्टीस पडत होतास, त्या वेळेस मी सगळ्या गोष्टी बाजूला ठेवून—त्यांचा बिलकूल विचार न करतां—तुझ्या मानसिक विकासाविषयीं शक्य तेवढें करावयाचें ठरविलें होतें, हें तूं जाणतोसच. तुला माहीत नाहींत अशा कित्येक गोष्टी आहेत—त्या तुला माहिती होऊं नयेत—तुला व्यवहाराचें पूर्ण ज्ञान होईपर्यंत तरी निदान त्या तुला समजूं नयेत असा हेतू मनांत होता; आणि म्हणून निर्मलेच्या आईला निर्मलेसह मी येथून जवळजवळ हांकलूनच दिलें म्हणेनास. त्या वेळेला मी जर माझ्या या वर्तनाचा उलगडा केला असता तर तुझ्या मनाला एक प्रकारचा धक्काच बसला असता आणि तुझ्या मनावर त्याचा कदाचित् परिणामही झाला असता. म्हणून त्यावेळीं मी या बाबतींत एक अवाक्षरहि काढावयाचें नाहीं,

असें ठरविलें होतें; पण केव्हां तरी या साऱ्या गोष्टी एकदां तुला कळावयाला हव्यातच आणि म्हणूनच मी तुला आज मुद्दाम बोलाविलें आहे—' एवढें बोलून काका किंचित् स्तब्ध झाले. मुख्य विषयाला सुरवात कशी करावी याचा ते विचार करीत असावे.

नानाला मात्र आपल्या रहस्यमय आयुष्याची कल्पना होईना. 'नदीचें मूळ शोधूं नये' म्हणतात त्याचें कारण हेंच असावें कीं, अज्ञात गोष्टीमुळें होणारा आनंद त्या गोष्टीचें ज्ञान करून घेतल्यानें विनाकारण कां गमावावा ? त्याचें विचारचक्र पुन: सुरू झालें. 'या घरांतून मी बाहेर पडलों, त्याच वेळेला मी काळाच्या प्रवाहांत पडलों असें मला वाटत होतें; पण त्यापूर्वी मी 'प्रवाहपतित'च होतों हें मला आज कळतें आहे. आतां या प्रवाहाचा उगम......'

इतक्यांत काकांनीं आपलें बोलणें पुढें चालू केलें—

'नाना, निर्मलेची आई मला प्रथम पुण्याला भेटली. त्यावेळीं तूं कांहीं तरी दोनतीन वर्षांचा होतास. तिचा नवरा कधीं तरी पुण्यास दोन चार महिन्यांतून यायचा, आला कीं चार आठच दिवस राहायचा, त्या मुदतींत एक दोन वेळा तिला मारझोडहि व्हायची आणि शेवटीं त्रस्त होऊनच निघून जायचा—तो पुनः असाच केव्हां तरी उगवायचा, तोहि तरुण आणि तीहि तरुण—पत्नीचें पोषण करण्याची हिंमत मात्र त्यांच्यांत मुळींच नव्हती आणि म्हणूनच ही अशी मारझोड चालायची. तिची ही हकीगत मी जिथं उतरलों होतों तिथं मला मिळाली.

'एके दिवशीं सहज मी तिच्या दारावरून जात असतांना तिच्या घरांत डोकावून पाहिलें, तों ती रडत असल्याचें मला दिसलें. मी तरी कसा बोलणार एकदम तिच्याशीं—पण मला चैन पडेना. तूं आतां मोठा झाला आहेस—तुझ्याशीं आतां बोलायला कांहींच हरकत नाहीं. तिचं तारुण्य आणि तिची मोहकता याची मला कींव आली. तिला मी मदत करूं शकेन कां—तिला या दुःखांतून मी सोडवूं शकेन कां—याविषयीं मी सारखा विचार करीत होतो. तपास करतांना 'तिला तिच्या माहेरचं कोणी नाहीं, मात्र तिच्या बापाचे फक्त चार पांचशें रुपये तिला

मिळाले होते आणि त्यावरच ती आपला उदरनिर्वाह करी ' अशी माहिती मला मिळाली.

' एकदां ती आमच्या त्या मित्राच्या घरांत येऊन बोलत बसली होती तूंहि तिच्याजवळ होतास त्या वेळीं—'

' मी तिचा मुलगा ! ' दचकून नाना उद्गारला.

' हो, तूं तिचा मुलगा— ' अलीकडे या वर्षांत काय झालं आहे कोणास ठाऊक. घरांत लक्ष नाहीं तें नाहीं आणि नुसती छळणूक मांडली आहे '— ती बोलत होती. मी माझ्या खोलींतून ऐकत होतो. इतक्यांत तिचा नवरा तेथें आला आणि त्यानें तिला तेथून ओढून नेलें. पुढील प्रकाराची माहिती मिळावी म्हणून मी गॅलरींत येरझारा घालूं लागलों. तों तिच्या घराचें दार बंद असलेलें दिसलें. उभयतांचें संभाषण जोरजोरानें चाललेलें ऐकूं येत होतें; पण शब्द अस्पष्ट. थोड्याच वेळांत कोणीतरी श्रीमुखांत दिल्याचा आवाज ऐकूं आला आणि थोड्याच वेळानें तुझ्याहि रडण्याचा आवाज ऐकू आला—'

' काका माझा उल्लेख न करतां बोला ना—माझ्या छातींत एकदम जलद ठोके पडूं लागतात—मी स्वप्नांत आहे कीं काय असें मला वाटतें— ' तो मुलगा ' असं म्हणाला तर बरं होईल. '

' भीति वाटते काय तुला—बरं ऐक—मी चटकन् दार उघडून आंत शिरलों. तिच्या नवऱ्याच्या डोळ्यांतून पाणी ओघळत होतें. ती त्या मुलाला घेऊन बसली होती. मला पाहिल्यावर तो मोठ्यानें हसूं लागला— त्याला वेड लागलें आहे अशी माझी खात्री झाली. फार कष्टानें मिळविलेल्या तिच्या संमतीनें त्याला मी मेंटल हॉस्पिटलमध्यें पोहोचते केलें आणि त्या मुलासह तिला मी येथें माझ्या घरीं रहावयास घेऊन आलों—थोडक्यांत सांगणार आहे तुला—माहिती असावी याच दृष्टीनें हें सारं सांगत आहे—

' सरोज नंतर झाली. हिला तूं अगदीं हवासा वाटूं लागलास; पण तिला मात्र ही घरांत राहूं देण्यास तयार होईना. म्हणून मी तिला दुसरीकडे रहाण्याची सोय करून दिली. तिला एक शिवण्याचें मशीन

घेऊन दिलें. आणि त्यावर ती थोडे पैसे मिळवूं लागली. मीहि तिला अधून मधून थोडी मदत करीत असे. तिची एकंदर जबाबदारी मी माझ्यावरच घेतली असल्यामुळें सर्वतोपरी तिची काळजी घेणें मला प्राप्तच होतें.

'दोनतीन वर्षांनी तिचा नवरा बरा होऊन पुन्हा तिचा शोध काढीत तिच्या घरीं एक दिवस आला. त्याची स्थिति बरीच सुधारली असल्याचें मला दिसलें. मी रोज तिच्या घरीं जाऊन त्याच्याशीं बोलत असें. आणि एक महिन्याच्या विश्रांतीनंतर कांहीं तरी उद्योग म्हणून त्याला एक दुकान काढून देण्याचें मी ठरविलें. त्याला हा विचार पटत नव्हताच; पण कसा बसा तयार झाला तो दुकानदारी करायला, आणि दुकानाच्या मांडणीची जुळवाजुळव चालली असतांनाच एक दिवस तो जो पळून गेला, तो पुन्हां आलाच नाहीं.

'जग माहिती झालं असेल तुला आतां—'

'अगदीं चांगल माहीत झालं—' नाना म्हणाला.

'हं! मी ह्या सगळ्या गोष्टी करतों तें तिच्याशीं माझा कांहीं तरी संबंध असावा म्हणूनच असा लोकांनीं तर्क केला. अर्थात् मी त्याला जुमानीत नव्हतोच.

'—नंतर तिला एक मुलगी झाली तिचें नांव निर्मला ठेवलें. आणि यामुळें तर माझ्याविषयींच्या लोकांच्या शंकेला चांगलाच जोर आला. लोक कधीं कधीं एकांतीं उघड बोलूं लागले.

'परंतु मी एक सत्कृत्यच करीत आहे अशी माझी ठाम समजूत होती; नवऱ्याच्या त्रासाला कंटाळून तिला जो अनिष्ट मार्ग पत्करावा लागला असता, स्वैराचाराच्या धुंदींत तिच्या आयुष्याचे जे धिंडवडे झाले असते त्यापेक्षां तिला मी स्वावलंबी बनवीत आहे आणि तिच्या आयुष्यालाहि एक प्रकारचें निराळें वळण लागण्यास मीच कारणीभूत होत आहे, हें मला अतिशय समाधानकारक वाटे. माझा सामाजिक दर्जा चांगलाच असल्यामुळें समाजानेंहि माझा विशेष पाठपुरावा केला नाहीं.

' अशींच कांहीं वर्षे गेल्यानंतर· एक दिवस ती मला म्हणाली, ' काका, इतके दिवस जगून जीवन व्यर्थ आहे. नेहमींच रुक्षता–रुचत नाहीं ती जिवाला. दुर्दैवानें नशीबांत काय लिहून ठेवलं आहे कोण जाणें ! त्यांना दुकान घालून देतो कशाला म्हणालात ? त्यांच्यांनीं उद्योग-धंदा कधींच होणारा नाहीं . . .' तिच्या मनाची ही चलबिचल मी ओळखली, तुला म्हणून ही सगळी हकीगत सांगतो–साहाजिकच आहे. तरुण जीव तिचा—कुठल्या आकांक्षा कधीं पुरल्या नाहींत, म्हणजे मानसिक यातना फार होत असतात; पण या तिच्या बोलण्यामुळें तिच्याविषयीं मला एक प्रकारची भीति वाटूं लागली, आणि तुला पाहून तरी तिचें मन शान्त होतें काय पहावें म्हणून मी तुला रोज तिच्याकडे पाठवूं लागलों. मात्र ' ती तुझी कोण ? ' याची जाणीव तुला न देण्याबद्दल तिला सक्त ताकीद दिली होती. माझ्यावर असलेल्या प्रेमामुळें तिनेंहि ती ताकीद अक्षरशः पाळली.

' मात्र त्यामुळें तिला समाधान होण्याऐवजीं दुःखच होऊं लागलें. आपल्या हक्काचं माणूस; पण त्याच्यावर आपला हक्क मात्र आपणास गाजवितां येऊं नये याबद्दल तिला वाईट वाटे. ती गोष्ट तिच्या मनाला डाचूं लागली.

' मी ज्या तऱ्हेनें तिला सुखी करण्याचा प्रयत्न करीत होतो, त्या तऱ्हेनें ती सुखी होत नव्हती. उलट ती उदासीन मात्र अधिक होत चालली. ' तिचा पुनः एकवार दुसऱ्या कोणाशीं तरी विवाह लावावा ' असेंहि एकवार मला वाटलें; पण त्या मार्गांत अडचणी फार होत्या.

' अशींच आणखीं दोन तीन वर्षे गेलीं. मला तिच्या वागण्यांत थोडा बदल दिसूं लागला. मी तिच्या समाचाराला गेलों कीं ती अगदीं माझें हंसून स्वागत करी. माझ्याशीं अगदीं प्रेमळपणानें बोले. जसा मी तिचा अगदीं वडील भाऊच. मला आनंद होत होता; पण शंकाहि यायला लागली थोडीशी, आणि ती शेवटीं खरी ठरली. स्पष्ट कशाला बोलूं–अर्थात माझ्या स्वभावानुसार मला तें पटणारें नव्हतेंच—गांवांत पुन्हा बभ्रा––शिवाय दुसरं मला असं वाटूं लागलं कीं, त्या निर्मलेवर

कदाचित् तुझं प्रेमहि बसेल पुढें मागें—त्यांत कांहीं वावगं होणार होतं असं माझं मत नव्हतं; पण विनाकारण तसल्या फंदांत कशाला पडा—हा माझा विचार म्हणून मी तिची येथून हकालपट्टी केली.

'आणि परवां निर्मलेचा फोटो तुझ्याकडे आला असून, तूं तिच्यावर प्रेम करूं लागलास, असं मला समजल्यावर मला भयंकर राग आला होता; पण त्याहीपेक्षां तुझ्या भित्रेपणाचा मला ज्यास्त राग आला होता. मी अगदीं सनातनी मताचा नाहीं. आतां तुला वाटलं येथें रहा-वसं तर रहा—नाहींतर— तूं आतां जाणता झालास, मोठा झालास, तेव्हां मी तुला चार गोष्टी सांगाव्यात अशातला कांहीं भाग नाहीं.'

काकांचं बोलणं संपलं होतं तरी नाना स्वस्थच बसला होता. गाडींतल्या मनुष्यांनीं जें सांगितलें तेच थोडा फरक करून काका सांगतात. या बाबतींत स्वतः दोषी नाहीं असें सिद्ध करण्याकरतां भाषेला वळण देऊन त्यांनीं सर्व गोष्टी सांगितल्या—तो गृहस्थ तरी कसा अचानक भेटला कोण जाणें ! त्याच्या भाषेंत त्यानें काकांना बदमाष ठरविलें होतें. काकानीं त्याच्या बायकोला फूस लावून पळवून नेली असें तो म्हणत होता. त्याच्या संसाराचा खेळ खंडोबा काकांनीं केला असा त्याचा आरोप होता. त्यामुळें त्या गृहस्थाला स्वतःची बायको—मुलं सोडून रानोमाळ भटकून वेड लागण्याची अवस्था आली होती.

—आणि काकांच्या भाषेंत—तो वेडसर प्राणी—ज्याला कुटुंब-पोषणाची अक्कल नाहीं असा—

—ती माझी आई आज जिवंत असती तर—मला ती मुळींच कशी आठवत नाहीं ! मी १७–१८ वर्षांचा होईपर्यंत ती येथेंच होती—कसली आई ती—

—पण यांत खरं कोणाचं ?

—झाल्या गेल्या गोष्टी—पुढें वहाणाऱ्या प्रवाहाचा जोर मागें पाहूं तरी कुठं देत आहे मला !—

—आतां काय त्याचं ! कोणी कसा कां असेना—

—पण निर्मला माझी सख्खी बहीण !

—आणि सरोज एका बदमाष बापाची पोरगी !

—दोघीविषयीं एके काळीं माझ्या हृदयांत किती प्रेम आणि आदर होता !—

त्याचा विचार चालला होता; पण काका मध्येंच म्हणाले, ' निर्मला, बरी आहे ना आतां— ? '

प्रवाहांतून वहात असतांना एखाद्या खडकावर आपटल्यासारखं वाटलं त्याला. मान किंचित् वर करून त्यानें काकांकडे पाहिलें.

' हो, बरी आहे ' नानानें उत्तर दिलें; मात्र काकांच्या तोंडावर त्यानें जी दृष्टि लावली ती कांहीं तो हलवीना. त्याला वाटलें, ' काकांचा चेहेरा अजून किती उमदा दिसतो ! विकाराच्या ताब्यांत कधीं तरी हे गेले असतील कां ? ' काकांच्या तोंडावरील भावना त्याला त्यांना ' बदमाष ' म्हणूं देईनात; पण त्याच्या मनांत मात्र ' काका बदमाष आहेत–नाहींत असें द्वंद्व चालू होतें.

थोड्या वेळानें तो चटकन् उठला आणि जाऊं लागला. तेव्हां काकांनीं त्याला मुद्दाम बोलावून सांगितलें, ' हिला भेटून जा बरं का. तिच्याकरितां तर तुला मी इतक्या आग्रहानें बोलाविलें. '

जाताना काकूला भेटल्याशिवाय तो जाणार नव्हताच. काकांच्या बोलण्यावर ' हं ' म्हणून तो काकूंकडे आला. काकू त्याची वाट पहात होत्या. तो घरांत आल्यावर सरोज तेथून उठून गेली. काकूंशीं थोड्या गप्पागोष्टी झाल्यावर तो निघाला. त्याला रहाण्यासाठीं काकूंनीं पुष्कळ आग्रह केला; परंतु ' आज मला रहातां यायचं नाहीं, पुन्हां येईन कधींतरी, ' असें म्हणून त्यानं आपली सुटका करून घेतली.

परंतु सरोजनें वाटेंत त्याला हांक मारली व तो जागच्या जागीं थबकला.

' मंदा आलीय ना सोलापूरला ? ' कांहीं तरी बोलायचें म्हणून ती म्हणाली.

' मला कांहीं माहीत नाहीं. डॉक्टरच्याबरोबर कोणी तरी होतं

खरं—' एवढेंच बोलून तो चालूं लागला.

सरोज खिन्न वदनानें आपल्या खोलीकडे परतली.

---

# २७

'मी काय करतो कोणास ठाऊक! सरोजला माझ्याशीं किती बोलावयाचं होतं! तिची निराशा झाली असेल अगदीं; पण माझी मनःस्थिति नीट नसतांना मी तिच्याशीं कसा बोलूं शकलों असतों? काकांनीं सांगितलेली हकीगत खरी असली तर—काका किती चांगले, अजून काकांच्या विषयीं माझें मन संशयांत आहे का?'

'सरोज-छे, चुकलंच नाहीं कां अगदीं-बोललो असतो तिच्याशीं तर काय माझ्या झोळींत धोंडा पडला असता? जाऊ कां परत-बोलूं का तिच्याशीं? माझ्याकरतां काय वाटतं तिला कोण जाणें! मी तें समजून कां घेतलें नाहीं?—

'कांहीं सुचत नाहीं—सरोज-सरोज-अरे, हाच शब्द विचारांच्या गर्दीतून एकदम उंच डोकावतो. मूर्तिमंत उदासीनतेचें तिचें चित्र-डोळे खोल गेले होते नाहीं तिचे?-कशी दिसत होती ती कोण जाणे?—पुरतं पाहिलं सुद्धां नाहीं मी तिच्याकडं. सरोज-!'

रेल्वेचें तिकीट काढून तो गाडींत केव्हां बसला-सोलापूरच्या स्टेशनवर उतरून घरीं केव्हां गेला आणि बंद असलेल्या दारासमोर उभं राहून निर्मलेला त्यानें हांक कशी मारली—त्याला अगदीं नकळत झाल्या या साऱ्या गोष्टी!

घरांत गेल्यावर त्यानें कोट काढून खुंटीवर ठेवला आणि धोतराच्या सोग्यानें वारा घेत तो खुर्चीवर बसला.

'नाना—' निर्मलेनें हांक मारली.

किंचित् हंसून त्यानें तिच्याकडे पाहिलें.

'दमलास? काय झालं–काय म्हणाले काका–आणि इतक्या तातडीनें आलास–गाडी बरी मिळाली—'

'थोडा दमलों—काय व्हायचय–तुला मी जी गोष्ट सांगितली तीच काकांनीं निराळया शब्दांत मला सांगितली–कुठं राह्यचं तिथं–त्याच बेतानं काकांच्या घरांतून निघालों—'

'१०० पैकीं १०० हं मार्क तुला–क्रमवार प्रश्नांचीं उत्तरें मुद्देसूद देणारा तूंच पहिला विद्यार्थी–कदाचित् नोबेल प्राईज मिळण्याचा संभव आहे यामुळं. संवय घालवूं नकोस हं—'

'बरं बरं! पण तूं कधीं सरोजला पाहिली होतीस कां गं?

'कां?'

'कां नव्हे, उगीच विचारलं.'

'तरी—'

'तरी काय?—बरं ही मंडळी कुठं गेली?'

'कोण?'

'त्या बाई, भय्यासाहेब, डॉक्टर—'

'त्या बाई ना? भय्यासाहेबांच्या बरोबर गेल्यात कुठें तरी—आणि डॉक्टर दवाखान्यांत—नाना!'

निर्मलेची दृष्टि खालीं वळली. दृष्टि खालीं वळल्यावर केसांवरून हात फिरविण्याची तिची संवयच असली पाहिजे. त्याप्रमाणें ती केसांवरून हात फिरवूं लागली; तिची करांगुलि बाजूलाच होती.

'निर्मला! त्या कैदखान्यांत तूं याच पोजमध्यें होतीस; पण माझ्या मनाला केवढा धक्का बसला त्यावेळीं—आणि निर्मला, आज! किती छान दिसतेस गं तूं!'

'नाना!'

‘ तुला कांहीं विचारायचंय कां मला ?’ तिला कांहीं विचारावयाचं आहे, हें त्याला आतां समजलें.

‘ तुला येथें बोलावलं मी—’

‘ कां ?’

‘ नाना—रागावायचा नाहींस ना तूं ?’

‘ निर्मला—तुझ्या करतां मी वाटेल तें करायला तयार झालों होतों. अजून होईन—मी माझ्या मनाशीं लहानपणापासून तुझा कलंक धुवून टाकण्याची प्रतिज्ञा केली होती.’

‘ निर्मला सांग ना ?’

‘ तुला मी विचारलं नाहीं यापूर्वी आणि मनानींच ठरवलं—भीति वाटते तुझी मला.’

‘ निर्मला, जवळ ये माझ्या—’ तो म्हणाला आणि तिच्या डोक्यापाठीवरून हलका हात फिरवून तो पुढें म्हणाला, ‘ निर्मला, भिऊं नकोस.’

‘ डॉक्टरांचं माझ्यावर प्रेम आहे.’ त्याला ती ज्यास्ती बिलगली.

‘ निर्मला—गिरी तुझ्यावर प्रेमच करीत होता. निर्मला, तूं कोण आहेस, कशी आहेस हें आहे कां त्यांना माहिती? फसणार नाहींस ना तूं ? निर्मला, तुझ्या पहिल्या आयुष्याचं भेसूर चित्र माझ्या डोळ्यांसमोर उभं राहूं लागलं आहे. निर्मला, वर पहा पाहूं जरा.’

‘ नाना—’ तिनें जरा वर पाहिलें.—

‘ आणि तुझें आहे कां त्यांच्यावर प्रेम ?’ त्यानें विचारलें. तिनें त्याच्यापासून किंचित् बाजूला सरून होकारार्थी मान हालविली. तो तिच्याकडे पाहातच राहिला !

‘ निर्मला, तुझ्यावर प्रेमाचा जुलूम नाहीं ना होत ?’

‘ नाहीं, नाना.’—नाना गप्पच बसला होता.

‘ प्रेम-काय प्रकार आहे कोण जाणे ? कसलं असतं हें प्रेम—मी नव्हतो कां कुणावर प्रेम करीत—निर्मलेवर माझं किती तरी प्रेम

आहे! सरोजवर पण नव्हतं कां? सरोज! गरीब बिचारी सरोज!'— त्यानें टेबलावर डोकें टेकलें.

'नाना, वाईट कां वाटतं तुला?'

'निर्मला—' हातावरनं मान किंचित् उंचावून तिरपी करीत तो बोलत होता— 'प्रेम! मागील एक एक प्रसंग आठवले कीं भडभडून येऊ लागतं—भावना समजाऊन घ्यायची शक्ति माझ्यांत नाहीं आणि समजल्या तरी तिकडे बेफिकीर वृत्तीनें पहायचें—आज मला ही माझी वागण्याची रीत चैन पडूं देत नाहीं. निर्मला, मी आतां जगांतून नाहींसा झालों तर परमेश्वराचे किती उपकार होतील माझ्यावर! तुझी काळजी मिटली; तूं आतां सुखांत राहूं शकशील!'

काय झालं? माझं चुकलं कां—मी चुकलों कां? तुला विचारलं नाहीं, अपराध झाला कां माझा? नाना, मी शपथ-पूर्वक सांगते, तुला हें पटत नसेल तर मी माझा हट्ट सोडून द्यावयाला तयार आहे, तुझ्या सुखाकरतां—'

'निर्मले, तसं नव्हे तें. मी उपरोधिक बोलत नाहीं. सरोज, माझ्या डोळ्यापुढें सारखी उभी रहात आहे. तुला माहीत नाहीं ती—
—सरोज—' असें म्हणून त्यानें आपलें डोकें पुन्हा टेबलावर टेकलें.

'इतकं विव्हळ व्हायला काय झालं?' ती म्हणाली. 'फार विचार करूं नये.' ती पुढें म्हणाली.

'रहावत नाहीं अगदीं. मी कोणाचा बळी तर घेत नाहींना, असं वाटायला लागलं आहे मला.'

'जरा विश्रांति घे. वाच कांहीं तरी, नाहीं तर झोप घे. वाटेच्या श्रमांनीं दमला असशील—झोप येईल तुला—कांहीं खाणं पिणं—देऊं कां कांहीं करून?'

'किती एकदम प्रश्न विचारतेस निर्मले—अशा स्थितींतसुद्धां हसूं येतं तुझ्या असल्या प्रश्नांजलीनं—'

'मग हांसना—हं! पाहूं कसं हंसतोस तें. नाना, हांसना—' कसें तरी तो थोडेसें हंसला.

' निर्मला, तुझ्या लग्नाच्या गोष्टी बोलूं आपण—म्हणजे कदाचित् विसर पडेल. '

' हं—' बोलण्यासारखं काय होतं? कांहीं नव्हतंच म्हणून तिनें नुसतें त्याला बरं वाटावं म्हणून ' हं ' केलें.

' उद्यां तुझं लग्न होणार—नर्सची डॉक्टरीण होणार तूं-निर्मले, मला तुझ्या या एकंदर प्रगतीबद्दल किती आनंद होतो. निर्मला, डॉक्टरांचे केवढे उपकार माझ्यावर होणार आहेत यामुळें—मी तुझीं मुलं खेळवायला त्यांच्या घरीं नोकर म्हणून राहिलों तरीसुद्धां त्यांचे उपकार फिटणार नाहींत. '

इतक्यांत डॉक्टरहि तेथें हजर झाले.

' काकांच काय होतं काम?' आल्याबरोबर त्यांनीं विचारले.

आमच्या जीवनाची कथा सांगितली त्यांनीं मला—फार विचित्र आहे ती. ती ऐकल्यावर 'कदाचित्—' कोणाच्या सुखांत कसं विरजण पडेल तें सांगतां येत नाहीं. ' हें शेवटचें वाक्य ऐकल्यावर निर्मला कांहीं तरी काम काढून बाहेर निघून गेली. ती निघून गेल्यावर मोहन पूर्वीचा विषय बाजूला टाकून म्हणाला.

' नाना, मी निर्मलेशीं लग्न करायचं ठरवलं आहे. त्याला तुमची संमति पाहिजे फक्त. '

' माझी? '

' होय तुमचीच—तिचं असं दुसरं कोण आहे? '

' त्यामुळें कांहीं घोटाळे—तुमच्या घरीं—'

' छे, छे—त्याची काळजी नकोच—'

' माझी कांहीं हरकत नाहीं. '

' तुम्हाला कसं विचारावं या विचारांत मी होतों; पण चटकन् आपलं विचारून टाकावं म्हटलं. '

' डॉक्टर, याबद्दल मी फार आभारी आहे आणि जन्मोजन्मीं मी या तुमच्या कृत्याबद्दल तुमच्याशीं कृतज्ञ राहिलों तरी हे तुमचे उप-

कार फिटले जाणार नाहींत. निर्मला सुखी होणार ही कल्पनाच मला किती सुख देत आहे याची कल्पना कोणालाच करता येणार नाहीं. तुमची माझी फक्त अमिराबादला ओळख झाली तेवढीच. त्या तेवढ्या ओळखीवरच मी निर्मलेला तुमच्या हवालीं केली आणि निघून गेलों. माझी खात्री होती डॉक्टर कीं तिच्या आयुष्याचं ज्यामुळें चांगलं होईल असंच तुम्ही कराल—उपकार—'

'नाना, पुरे आता. पुष्कळ झाली स्तुति. नुसत्या भावनेचीं हीं कामं नसतात. मी तुम्हाला पूर्वीपासून ओळखतों. भावनेला कर्तव्याची जोड असल्याशिवाय आयुष्यांत सुख नाहीं मिळत. मनाचं समाधान नाहीं होत. तेंच तुम्ही केलंत नाना, म्हणून निर्मला या परिस्थितींत दिसत आहे आज.'

'पण यांत मी काय केलं? तिनं तुम्हाला सांगितली असेल हकीगत— धवलपुराहून ती गेल्यानंतर मला ज्या अवस्थेंत ती अकस्मात भेटली, त्यावेळीं मी तिच्याविषयीं किती विटलों होतों-चिडलों होतों! भावनेच्या आहारींच जाऊन तिला तशीच तिथें ठेवून मी निघालों होतों ना? तिला व्यवस्थित मार्गाला लावलीत तुम्ही—'

'तुमचा हा विनय आहे. माझाहि विनय आहे. तेव्हां विनयानें आपण एकमेकांना ज्यास्त ज्यास्त श्रेय देत बसणार—तें संपणार नाहीं कधींच—तिला ज्या वेळीं तुम्ही इथें माझ्याकडे सोपविली, त्याच वेळीं माझें तिच्याविषयींचं कर्तव्य काय आहे हें मी समजलों. तुमच्याविषयीं अमिराबादला असतांना मी अनेक बातम्या ऐकल्या होत्या आणि अशा मनुष्यावर सरोज प्रेम करतें हें पाहून मी तिच्यावर चिडलोंहि होतों; परंतु प्रेमी माणसांच्या शब्दकोशांतील प्रेम कांहीं निराळंच असतं. त्याला ते बरेचसें मोठें नांव देतात—त्याविरुद्ध जरा बोललं कीं, त्यांच्या भावना दुखावतात; म्हणून मी कांहीं स्पष्ट बोललों नाहीं,—पण त्या दिवशीं तुम्ही माझ्याकडे आलांत आणि हिच्याविषयीं दोन शब्द सांगितलेत, त्या वेळीं तुमच्या हृदयाची मला ओळख पटली. नाना, पण मला आतां जरा वाईट वाटतं तें हेंच कीं, परवां मी धवलपुरला गेलों

त्या वेळीं सरोजजवळ तुमच्या आयुष्याचा निर्मलेच्या बाबतींत उलगडा केला नाहीं; अर्थात् तुम्ही मला तसंच सांगितलं होतं— पण आतां वाटतं या बाबतींत कांहीं बोललों असतों तर तुम्हांलाहि कांहीं वाटलं नसतं. ती बिचारी अगदीं खंगत चालली आहे. '

नाना काय बोलणार ? मोहन जें जें बोलेल तेवढें ऐकून घेत तो स्वस्थ बसला होता.

'नाना—' मोहननें पुढें बोलण्यास सुरुवात केली. इतक्यांत भय्यासाहेब आणि मंदेला बरोबर घेऊन निर्मला आली.

'नाना ! संभाळ तुझे हे भय्यासाहेब आणि डॉक्टर, संभाळाहो तुमची ही मंदा—' निर्मला म्हणाली.

'भय्यासाहेब कां ? झाला तुमचा पुनर्विवाह ?'

'जरा नीट बोलावं कीं,—पुनर्विवाह म्हणजे काय माहिती आहे कां ?'

'हें पहा आतांपासूनच नको माझ्यावर तुझी ताबेदारी ?'

'म्हणजे काय ?—काय लग्न बिग्न ठरलं कीं काय तुमचं ?' मंदा म्हणाली.

'आणि नाना कां गप्प बसलेत ?' भय्यासाहेब मध्येंच म्हणाले.

'छे ! आतांपर्यंत आम्ही बोलतं होतो किती तरी ?' नाना मोहनकडे हात दाखवीत म्हणाला.

'आतां आम्ही कुठें तरी प्लेझर-ट्रिपला जाणार आहोत-' मंदा म्हणाली.

'आम्हीं म्हणजे ?' मोहननें विचारलें.

'मी आणि भय्यासाहेब.' मंदेनें उत्तर दिलें.

'आणि आम्हीं ?' मोहननें विचारलें.

'तुम्ही कोण ?' मंदेनें उलट प्रश्न केला.

'मी, निर्मला आणि नाना. चालेल ना आलों तर ?'

'मला नाहीं कुठें जावसं वाटत. जायचं तरी कुठें ?' नाना उदासीनतेनें म्हणाला.

'धवलपूरलाच जायचं. दुसरं कुठें?' मंदा म्हणाली.

धवलपूरचं नांव ऐकतांच नानानें आपली संमत्ति दर्शविली आणि तिसरे दिवशीं निघण्याचे त्यांचे नक्की झालें. इतक्यांत मोहनच्या नांवची एक तार आली. त्या तारेंत—

मोहनला अतिशय जरूरीच्या कामासाठीं धवलपूरच्या हॉस्पिटलमध्यें तावडतोब बोलावल्याचा मजकूर होता. त्यामुळें त्यानें आपण पुढें जावयाचें ठरवून बाकीच्यांना मागून ठरलेल्या दिवशीं यावयास सांगितलें.

---

# २८

दूर दूर किती तरी, एक तारका परी!

आतां कुठं आहे ती तारका? पदच्युत झाली ती-स्थानभ्रष्ट झाली ती काय पाप केलं होतं तिनं?

भावना—आशेची भावना-जी जीव जगविते-मरणाऱ्या जीवाचं जीवन होते. त्या भावनेचे घोट घेत घेत जीव जगतो, आणि तिला जगविण्याकरतां जीवाला जगावं लागतं. हाडाचीं काडं होईपर्यंत आशा आणि जीव जगतो, हृदयाच्या सापळ्यांत जीवाला बिलगून आशा रहाते; पण सापळ्यांत कोंडमारा झालेला जीव आशेपासून अलग होऊं लागतो. आशेचा आधार सुटूं लागतो. त्यामुळें आशा स्थानभ्रष्ट होते-पदच्युत होते-पण मग जीवाचं काय होतं?

आशा आणि जीव हीं एकमेकांचीं आकर्षणें आहेत. आशा ढासळली कीं जीव जगत नाहीं. जीवावसानानंतर सुद्धां आशा रहाते

म्हणतात तें कसें कोण जाणें! शुद्ध स्वरूपांत मन आशेचीं किरणें ओळखत नाहीं. त्याला आकाशांतली तारका दिसते. ती आशेची तारकाच जीवाला जगवीत आहे असें तें मानतें. आणि आशा ढासळली कीं ती दूरची तारका कोसळली असें तें म्हणतें.

‘ दूर दूर किती तरी, एक तारका परी। ’ सरोज बडबडत होती. कशी दिसेल आज ती तुम्हांला? आशेनें पाजलेलें अमृत (!) पिऊन ती कॉटवर पडली होती. आशेच्या उपकाराची फेड करण्याच्या बुद्धीनेंच जणूं ती आशेला जगवीत होती. तिनें डोळे मिटले होते; पण पापण्याआडून दिसणारे तिच्या डोळयाचे गर्भ आज दिसत नव्हते. खोल गेले होते तिचे डोळे. हंसतांना तिच्या गालांना जिथें लहानशी खळी पडे तिथें आज खळगे निर्माण झाले होते. छे! नकोच तें भेसूर वर्णन. आशेनें जगविलेला हा एक जीव आहे इतकेंच पुरे.

‘ सुटणार आहेना मी या संकटांतून? सुटूं कशी? एकच शब्द बोलला असतां तर—माणसाला राग येत नाहीं असें नाहीं; पण इतकं रागावणं चांगलं कां? ’ तिची बडबड चालूं होती.

डॉ. मोहन जवळच होते.

‘ डॉक्टर—’ काकांच्या डोळयांतून आंसवें ओघळूं लागलीं होतीं.

‘ काका, घाबरूं नका–तिचं सगळं अंग भाजलं आहेना? अशीच उलघाल चालायची. तुम्ही आणि काकू आतां येथें नका बसूं. तुम्हाला बसवायचं नाहीं, पहावायचं नाहीं. मी इथेंच आहे कीं! आणि नानालाहि बोलावला आहे. तोहि येईल आतां. जा तुम्ही. बरं वाटेल तिला.’ मोहननें सांगितलें. सरोजचें लक्ष कोणाकडेहि नव्हतें. ती कुठें पहात होती आणि कसला विचार करीत होती याचा कुणाला पत्ताच नव्हता.

‘ दुसरीकडे काय चैन पडणार आहे मला? ’ काका म्हणाले.

‘ तें खरं; पण तुम्ही जावं अशी माझी इच्छा आहे. काकू रडूं नका बरं, वाटेल बरं तिला! जरा वेळ हें असं चालायचंच! जा पाहूं.

त्या शेजारच्या खोलींत जाऊन बसा. या वेळीं तिच्याजवळ माणसं असणं श्रेयस्कर नाहीं. तिला मानसिक त्रास फार झाला आहे. आणि त्याकरतांच मी तुम्हांला जरा बाहेर जावयास सांगतों आहे.' डॉक्टरांनीं कशी तरी त्यांची समजूत घातली. काका--काकू निघून गेल्यावर— मोहननें हाक मारली. 'सरोज—'

पण तिचं लक्ष होतं कुठं कोणाच्या बोलण्याकडे. तिचे विचार चालूंच होते. विचाराचे प्रतीक म्हणजे भाषा-ती अस्फुट बोलत होती.

'नाना—ही शेवटची घटका—मुहूर्तघटका आहे ही—घटका भरली........., कसं बोलावूं तुला ? कोणची हाक मारूं ? काय झालंय कोण जाणें ? या शेवटच्या घटकेला जरी 'तूं माझी आहेस' असें म्हणून गेलास--तरी-तरी किती बरं वाटेल मला ! अजून कसा नाहीं आलास ? त्या दिवशीं तुला आहो-जाहो म्हटलं-रागावलास कीं-म्हणून आतां तरी माझ्याकडून अपमान होत नाहीं ना तुझा ? काकांच्याकडे येऊन माझ्याशीं एक शब्दहि नाहीं बोललास काल ! काय मी पाप केलं आहे रे ! आणि झालं असल्यास त्याचं प्रायश्चित्तहि लवकर घेण्याचा प्रयत्न करूनहि घेतां येत नाहीं. एकदां ये-भेट मला-अगदीं कडकडून-नाना—!'

तिच्या कंठांतून अगदीं आर्त स्वर निघूं लागला. ती बेशुद्ध होते कीं काय अशी भीति मोहनला वाटूं लागली. म्हणून त्यानें तिला पुन्हां हांक मारली.

'कोण नाना ?' ती म्हणाली.

'येईल हं आतां तो--' मोहन म्हणाला.

'अजून कां नाहीं आला ?'

'पण आतां कसं वाटतं तुला ?'

'भलतंच या वेळेला नका मला विचारूं ? मला काय झालंयू ? तो कां नाहीं आला अजून तें सांगा. बाकी येणार तरी कसा ? त्याला काय माहीत असणार. आणि असलं तरी त्यांनीं कां यावं ?'

'सरोज-सरोज-' ती अगदीं स्तब्ध झाली होती. त्याचे हांकेला

तिनें कसलीहि हालचाल केली नाहीं. 'सरोज' त्यानें पुन्हां हांक मारली.

'सरोज, नाना आला.'

'नाना—नाना—कुठें आहे तो. मला दिसत नाहीं. फसवूं नका मला.'

नाना, मंदा, निर्मला, भय्यासाहेब वगैरे मंडळी त्याच वेळेला दवाखान्यांत तिच्या वॉर्डमध्यें येऊन दाखल झाली होती.

'आणि हीं इतकीं माणसं कशाला आलीं आहेत—त्यांचं काय काम आहे? सरला आली आहे कां? ती तेवढी नाहीं दिसत.' एकदम भाषावेग तिला सहन होईना. ती जरा थांबून म्हणाली. 'माझी या सर्वांच्याशीं ओळख करून.'

'आपलींच माणसं आहेत हीं सगळीं.——निर्मला आली आहे.' मोहन म्हणाला.

'निर्मला—निर्मला आणि नाना—कुठं आहे ती?'

'सरोज, ही पहा निर्मला.'

सरोजला केव्हां भेटेन असें नानाला झालें होतें. परंतु ती अत्यंत आजारी असल्यामुळें तिला एकदम भेटल्यास कांहीं तरी विपरीत परिणाम होईल या भीतीनें तो ह्या वेळपर्यंत कांहीं बोललाच नाहीं; परंतु आतां ती जरा बरी आहे असें त्याला वाटल्यामुळें तो निर्मलेला तिला दाखविण्या-करितां जरा पुढें सरला. निर्मलेकडे सरोजनें एकदां पाहिलें आणि एक दीर्घ निश्वास सोडून ती म्हणाली, 'निर्मला बरं आहे ना आतां?'

'सरोज, मला ओळखतां तुम्ही?'

'हो गं बाई! चांगली ओळखते. नाना, तूं याच्यापूर्वी, यावास असें सारखें वाटत होतें मला. आणि आतां आलास तर मला आनंद कां होत नाहीं? आनंद होण्याचीं इंद्रियें तर काळाच्या आगींत जळून नाहीं ना गेलीं? रुक्ष वाटतं—'

' सरोज, किती बोलतेस गं!-फार बोलूं नये आजाऱ्यांनीं-' बोलतां बोलतां तो तिच्याजवळ बसला. तिचे हात त्यानें आपल्या हातांत घेतां-क्षणींच त्याचें अंग थरारलें.

' नाना-आतां काय एखादा क्षण राहिला असेल. तेवढ्या वेळांत नको बोलूं तर काय करूं—परमेश्वरानें माझ्या नानाशीं शेवटच्या घटकेला तरी पुष्कळ बोलण्याकरतांच मला शुद्धीवर ठेवलं आहे--'

' सरोज —'

' नाना! निर्मला बरी आहे ना—'

' बरी आहे ती सरोज, पण तूं आतां स्वस्थ पड ना जरा.'

' नाना, त्याकरतांच तर मी दवाखान्यांत आले आहे—'

' असें बोलूं नये!'

' बोलावं तरी कसं रे— ' ती चिडल्या सारखी झाली.

' बरं बोल-तुला बोलवेल तितकं!'

' निर्मला कुठें आहे रे—'

निर्मला तिच्याजवळ आली. सरोजनें तिला आपल्या कॉटवर बसवून घेतलें.

' निर्मला, नानाला नीट संभाळायचं बरकां-भित्रा आहे तो फार-'

' हें काय असलं बोलतां—'

' सगळीजणं असं काय छळतां मला—बोलूं कां देत नाहीं—' ती अतिशयच त्रासली होती. तिचे डोळे पाण्यानें भरून आले.

' सरोज--' नानानें तिच्या डोळ्याचें पाणी पुसलें. ' त्रास नको गं करून घेऊस-बोल-बोल माझ्याशीं— ' असें म्हणून तिला बोलण्याचा त्रास होऊं नये म्हणून तो तिच्या कानाजवळ आणखी सरकला.

' नाना—कितीरे तूं चांगला आहेस-' त्याचे दोन्ही हात घट्ट धरून तिनें आपल्या हृदयाशीं दाबले.

' नाना--' आणि ते तिचे शेवटचेच शब्द!

— समाप्त —